Add

# साहित्यशास्त्र

लेखक : कै. गणेश सदाशिवशास्त्री लेले



— अधिकारी-प्रकाशन —

पुणे २.

प्रकाशक :
सौ. कमलाबाई अधिकारी
मालक : अधिकारी प्रकाशन
३९६, नारायण पेठ
पुणें नं. २



दिनांक १ जानेवारी १९६३
किंमत रुपये चार
आवृत्ति तिसरी




मुद्रक :
न. शं. कुलकर्णी
टीचर्स प्रिंटिंग प्रेस
नवी पेठ, पुणें २



# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना



दुसऱ्या आवृत्तींत लेखकानें पुरवणी म्हणून पहिल्या दोन आवृत्तीपेक्षां दोन प्रकरणें आधिक लिहून प्रसिद्ध केलीं होतीं. या आवृत्तींत तीं, पुरवणी प्रकरणें म्हणून ( प्रकरण क्रमांक ९ व प्रकरण क्रमांक १० ) प्रसिद्ध केलींत.

त्याचप्रमाणें पहिल्या दोन आवृत्तींच्या प्रस्तावना "लेखकाचें मनोगत" म्हणून शेवटीं छापल्या आहेत.

प्रकाशक

# अनुक्रमणिका



---

# साहित्यशास्त्र



## प्रकरण पहिलें

**प्रश्न.**–**साहित्यशास्त्र** म्हणजे काय ?

**उत्तर.**–ज्या शास्त्रांत मुख्यत्वेंकरून **काव्याचें**, आणि काव्यसंबंधीं जे **शब्द**, **अर्थ**, **रस**, **अलंकार**, **गुण**, **दोष**, इत्यादिक विषय, ह्यांचें विवेचन केलेलें असतें, त्या शास्त्रास **साहित्यशास्त्र** असें म्हणतात.

**प्रश्न.**–**काव्य** म्हणजे काय ?

**उत्तर.**–शब्द व अर्थ ह्यांच्या योगानें मनोरंजन होण्याजोगें, आणि रसभरित, असें जें वास्तविक अथवा कल्पित वस्तूचें वर्णन केलें असतें, त्यास **काव्य** असें म्हणतात आणि असें काव्य करणारा जो, त्यास **कवि** असें म्हणतात. हें काव्याचें लक्षण वाक्यासहि लागू होतें.

**प्रश्न.**–**वाक्य** म्हणजे काय ?

**उत्तर.**–कर्ता, कर्म, क्रिया, इत्यादिवाचक जीं पदें, त्या पदांच्या समुदायास **वाक्य** असें म्हणावें.*

**प्रश्न.**–तीं पदें कशीं असलीं म्हणजे अर्थज्ञान बरोबर होतें ?

**उत्तर.**–तीं परस्पर **साकांक्ष**, **योग्य**, आणि **सन्निध**, अशीं असलीं म्हणजे वाक्यार्थाचें ज्ञान बरोबर होतें.

**प्रश्न.**–वाक्यांत परस्पर **साकांक्ष** पदें केव्हां असतात ?

**उत्तर.**–जेव्हां एक्या पदाचा अन्वय होण्यास दुसऱ्या पदाची आकांक्षा म्हणजे अपेक्षा लागते, तेव्हां तीं पदें परस्पर साकांक्ष असतात. जसें "**राजाचा सेवक**" ह्या वाक्यांत '**राजाचा**' ह्या पदाचा अन्वय जुळण्यास सेवक

* "एक्या क्रियेशीं क्रियाकारकभावादिसंबंधानें अन्वित होणारीं जीं अनेक पदें, त्यांचा जो त्या क्रियापदानें विशिष्ट समुदाय तें." असें वाक्याचें विशिष्ट लक्षण उक्त आहे.

कीं ब्रह्मदेव हा ह्या ( प्रस्तुत वर्णनीय ) राजाला निर्माण करूं लागला असतां " अहो स्वामी, तुम्ही कुलपर्वतांना ठेंगणें करूं नका, समुद्रांस उथळ करूं नका, तसेंच दिक्पाळांसहि ( इंद्रादिकांसहि ) लघुत्व आणूं नका; हा राजनिर्माणाचा यत्न बरा नव्हे बरें ! " ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाची सेवकजनांनीं वारंवार प्रार्थना केली असतांहि ब्रह्मदेवानें त्यांच्या प्रार्थनेचा अनादर करून हा राजा निर्माण केला.

ह्या श्लोकांत राजाचें उच्चत्व कुलपर्वतांच्याहूनहि विशेष; आणि त्याचें गांभीर्य समुद्रांच्याहूनहि अधिक, आणि त्याचें ऐश्वर्य दिक्पालांच्यापेक्षांहि अतिशयित आहे, हा अर्थ **व्यंग** होय. आणि ह्याच व्यंग्यरूप अर्थाला प्राधान्य आहे म्हणून हें काव्य **उत्तम** होय. अथवा,

**श्लोक नवीन**

**झालीसे गतचंदना स्तनतटी, ओंठा नसे रक्तता ।**
**नेत्रें अंजनहीन, दूति !' दिसती कायाहि रोमांचिता ।।**
**खोटें बोलसि, दुःख ठाउक नसे जें होतसे ह्या जना ।**
**स्नाना गेलिस येथुनी, न अधमापाशीं, खरें हें च ना ! ।। १ ।।**

कोणी एक्या नायिकेनें आपली दूती नायकास बोलावणें पाठविली होती, ती परत आली तेव्हां तिची चर्या पाहून तिजप्रत हें नायिकेचें वचन आहे. आणि 'अगे दूती, तुझ्या स्तनांची चंदनाची उटी, ओंठांचा तांबडा रंग व डोळ्यांतील काजळ नाहींसें झालें आहे; व तुझ्या शरीरावर कांटाहि उभा राहिला आहे; ह्यावरून पाहतां तूं मला काय दुःख होतें तें न जाणतां एथून स्नानाला गेलीस, त्या अधमाकडे गेली नाहींस असें दिसतें. असा ह्यांतील भावार्थ आहे.

ह्यांत तूं नायकापाशीं रत्यर्थंच गेलीस हा अर्थ **अधम** ह्या पदानें प्राधान्यें-करून व्यंजित होतो म्हणून हें काव्य **उत्तम** होय.

**प्रश्न.—मध्यम** काव्य कोणतें ?

**उत्तर.**—ज्यांत व्यंग्यार्थ अप्रधान किंवा गौण असतो त्या काव्यास **मध्यम** किंवा **गुणीभूतव्यंग्य** असें म्हणतात.

**श्लोक**

**शौर्यें जिंकुनियां क्षिती नरपती पट्टाभिषेका करी ।**
**आले तें शरणार्थी वैरिगण ते तन्मंडपाभीतरीं ।।**

**त्या त्या दावियल्या तिहीं करुनियां चेष्टा तया राजया ।**
**त्या पाहोनि मनीं तदा नृपतिच्या उत्पन्न झाली दया ।। १ ।।**

कोण्या एका **राजानें** आपल्या शौर्याच्या योगानें सर्व पृथ्वी जिंकून तो आपणास पट्टाभिषेकाचा उत्सव करीत असतां, त्याचे शत्रु त्याला शरण येऊन त्यांनीं सभेमध्यें राजाला त्या त्या चेष्टा करून दाखविल्या. त्या त्या पाहून त्या राजाच्या मनांत दया उत्पन्न झाली, असा ह्या श्लोकाचा अर्थ आहे.

एथें शत्रूंनीं राजापुढें त्या त्या चेष्टा दाखविल्या, हा अर्थ **वाच्य** म्हणजे मुख्य आहे, व दीनतापूर्वक पुनः पुनः नमस्कारादिक करणें हा अर्थ **व्यंग्य** आहे; आणि हा व्यंग्यार्थ पूर्वोक्त वाच्यार्थाहून गौण आहे, म्हणून हें काव्य **मध्यम** होय.

## अथवा आर्या

**ज्याच्या करांत विलसे अशोकनवमंजरी अशा तरुणा ।**
**वारंवार विलोकुनि तरुणीमुखकान्ति होतसे मलिना ।। १ ।।**

ज्याच्या हातांत अशोक वृक्षाची नवीन मंजरी आहे अशा तरुणास पाहून एके तरुणीची मुखकान्ति मलिन झाली, म्हणजे तोंड उतरलें असा ह्या आर्येंतील **वाच्यार्थ** आहे. आणि अशोकाच्या राईंत येण्याचा संकेत असून ती तेथें गेली नाहीं, हा अर्थ व्यंग्य असून वाच्यार्थाहून गौण आहे, म्हणून हें काव्य **मध्यम** अथवा **गुणीभूतव्यंग्य** होय.

**प्रश्न.–कनिष्ठ** अथवा **अव्यंग्य** काव्य कोणतें ?

**उत्तर.**–ज्यांत व्यंग्य स्पष्ट नसून केवळ शब्द किंवा अर्थ हे मात्र चमत्कारिक असतात, तें काव्य **कनिष्ठ** अथवा **अव्यंग्य** होय. यासच **चित्रकाव्य** असें म्हणतात.

## श्लोक

**फिरविते रवि ते दधिभीतरीं, मिरविते रवितेज नगांवरी ।।**
**स्वकरिं ते करिते चलता मनीं, उपरमे परमेश्वरगायनीं ।। १ ।।**

यशोदा दधिमंथन करूं लागली त्या वेळचें हें तिचें वर्णन ह्या श्लोकांत वामनपंडितानें केलें आहे. ह्यांत ती दह्यांत रवी फिरविते तेव्हां तिचे हात हालतात, आणि ती मनामध्यें परमेश्वराच्या गायनांत विराम पावते, इत्यादिक

कीं ब्रह्मदेव हा ह्या ( प्रस्तुत वर्णनीय ) राजाला निर्माण करूं लागला असतां " अहो स्वामी, तुम्ही कुलपर्वतांना ठेंगणें करूं नका, समुद्रांस उथळ करूं नका, तसेंच दिक्पाळांसहि ( इंद्रादिकांसहि ) लघुत्व आणूं नका; हा राजनिर्माणाचा यत्न बरा नव्हे बरें ! " ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाची सेवकजनांनीं वारंवार प्रार्थना केली असतांहि ब्रह्मदेवानें त्यांच्या प्रार्थनेचा अनादर करून हा राजा निर्माण केला.

ह्या श्लोकांत राजाचें उच्चत्व कुलपर्वतांच्याहूनहि विशेष; आणि त्याचें गांभीर्य समुद्रांच्याहूनहि अधिक, आणि त्याचें ऐश्वर्य दिक्पालांच्यापेक्षांहि अतिशयित आहे, हा अर्थ **व्यंग** होय. आणि ह्याच व्यंग्यरूप अर्थाला प्राधान्य आहे म्हणून हें काव्य **उत्तम** होय. अथवा,

### श्लोक नवीन

**झालीसे गतचंदना स्तनतटी, ओंठा नसे रक्तता ।**
**नेत्रें अंजनहीन, दूति !' दिसती कायाहि रोमांचिता ।।**
**खोटें बोलसि, दुःख ठाउक नसे जें होतसे ह्या जना ।**
**स्नाना गेलिस येथुनी, न अधमापाशीं, खरें हें च ना ! ॥ १ ॥**

कोणी एक्या नायिकेनें आपली दूती नायकास बोलावणें पाठविली होती, ती परत आली तेव्हां तिची चर्या पाहून तिजप्रत हें नायिकेचें वचन आहे. आणि ' अगे दूती, तुझ्या स्तनांची चंदनाची उटी, ओंठांचा तांबडा रंग व डोळ्यांतील काजळ नाहींसें झालें आहे; व तुझ्या शरीरावर कांटाहि उभा राहिला आहे; ह्यावरून पाहतां तूं मला काय दुःख होतें तें न जाणतां एथून स्नानाला गेलीस, त्या अधमाकडे गेली नाहींस असें दिसतें. असा ह्यांतील भावार्थ आहे.

ह्यांत तूं नायकापाशीं रत्यर्थच गेलीस हा अर्थ **अधम** ह्या पदानें प्राधान्यें-करून व्यंजित होतो म्हणून हें काव्य **उत्तम** होय.

**प्रश्न.–मध्यम** काव्य कोणतें ?

**उत्तर.**–ज्यांत व्यंग्यार्थ अप्रधान किंवा गौण असतो त्या काव्यास **मध्यम** किंवा **गुणीभूतव्यंग्य** असें म्हणतात.

### श्लोक

**शौर्यें जिंकुनियां क्षिती नरपती पट्टाभिषेका करी ।**
**आले तैं शरणार्थी वैरिगण ते तन्मंडपाभीतरीं ।।**

**त्या त्या दावियल्या तिहीं करुनियां चेष्टा तया राजया ।**
**त्या पाहोनि मनीं तदा नृपतिच्या उत्पन्न झाली दया ॥ १ ॥**

कोण्या एका **राजानें** आपल्या शौर्याच्या योगानें सर्व पृथ्वी जिंकून तो आपणास पट्टाभिषेकाचा उत्सव करीत असतां, त्याचे शत्रु त्याला शरण येऊन त्यांनीं सभेमध्यें राजाला त्या त्या चेष्टा करून दाखविल्या. त्या त्या पाहून त्या राजाच्या मनांत दया उत्पन्न झाली, असा ह्या श्लोकाचा अर्थ आहे.

एथें शत्रूंनीं राजापुढें त्या त्या चेष्टा दाखविल्या, हा अर्थ **वाच्य** म्हणजे मुख्य आहे, व दीनतापूर्वक पुनः पुनः नमस्कारादिक करणें हा अर्थ **व्यंग्य** आहे; आणि हा व्यंग्यार्थ पूर्वोक्त वाच्यार्थाहून **गौण** आहे, म्हणून हें काव्य **मध्यम** होय.

## अथवा आर्या

**ज्याच्या करांत विलसे अशोकनवमंजरी अशा तरुणा ।**
**वारंवार विलोकुनि तरुणीमुखकान्ति होतसे मलिना ॥ १ ॥**

ज्याच्या हातांत अशोक वृक्षाची नवीन मंजरी आहे अशा तरुणास पाहून एके तरुणीची मुखकान्ति मलिन झाली, म्हणजे तोंड उतरलें असा ह्या आर्येंतील **वाच्यार्थ** आहे. आणि अशोकाच्या राईंत येण्याचा संकेत असून ती तेथें गेली नाहीं, हा अर्थ व्यंग्य असून वाच्यार्थाहून गौण आहे, म्हणून हें काव्य **मध्यम** अथवा **गुणीभूतव्यंग्य** होय.

**प्रश्न.–कनिष्ठ** अथवा **अव्यंग्य** काव्य कोणतें ?

**उत्तर.**–ज्यांत व्यंग्य स्पष्ट नसून केवळ शब्द किंवा अर्थ हे मात्र चमत्कारिक असतात, तें काव्य **कनिष्ठ** अथवा **अव्यंग्य** होय. यासच **चित्रकाव्य** असें म्हणतात.

## श्लोक

**फिरविते रवि ते दधिभीतरीं, मिरविते रवितेज नगांवरी ॥**
**स्वकरिं ते करिते चलता मनीं, उपरमे परमेश्वरगायनीं ॥ १ ॥**

यशोदा दधिमंथन करूं लागली त्या वेळचें हें तिचें वर्णन ह्या श्लोकांत वामनपंडितानें केलें आहे. ह्यांत ती दह्यांत रवी फिरविते तेव्हां तिचे हात हालतात, आणि ती मनामध्यें परमेश्वराच्या गायनांत विराम पावते, इत्यादिक

अर्थ आहे. ह्या श्लोकांत व्यंग्य कांहीं स्पष्ट नाहीं, परंतु शब्दरचना फारच चमत्कारिक आहे म्हणून हें काव्य **कनिष्ठ** अथवा **चित्रसंज्ञक** होय.

### श्लोक नवीन

**घोडेस्वारचि फक्त द्या मजसवें ह्या वक्ति सक्ती बरी, ।**
**मुक्त्यारीच पुरे, न नक्त मजला, चंदी तुरी बाजरी, ॥**
**सुस्ती सोडुनि कुस्तिही करुनि मी घेईन दिल्लीपदा, ।**
**अब्दल्लीस वधीन येईल जरी त्या सोडवाया खुदा* ॥ १ ॥**
**लांडा फारचि दुष्ट नष्टहि तसा तो कष्टवीतो जना ।**
**खांडा दाउनि लौकरी करिन मी रांडा तदीयांगना ॥**
**सल्ला मोडिन त्यावरी करुनियां हल्ला, न गिल्ला बरा ।**
**गिल्च्यां गच्चि न देइं मी तरी मराठ्यांचा न बच्चा खरा ॥ २ ॥**

**पानपतच्या** लढाईंत **मराठे** लोकांचा पराभव झाला, आणि **गिल्ची** व **अफगाण** लोक ह्यानीं व त्यांचा बादशाह **अमेदशाह अबदल्ली** ह्यानें मोठी भयंकर क्रूरपणाची वर्तणूक केली, हें वर्तमान **पेशव्याच्या** दरबारीं कळल्यावर, त्याच्या पदरच्या सरदारांस वाईट वाटलें आणि मोठा क्रोध आला. त्या वेळचें कोण्या एक्या मराठी सरदाराचें हें पेशव्याप्रत आवेशयुक्त व वीरश्रीयुक्त वचन आहे.

ह्या श्लोकांत, ‘ मजबरोबर फक्त घोडेस्वार मात्र द्यावे. घोड्यांना तुरी व बाजरी हीच चंदी असली तरी चालेल; रोख पैसा खर्चायास नको; मजकडे मुक्त्यारी सांगावी म्हणजे मी सुस्त न राहातां ताबडतोब लढाई करीन, आणि दिल्लीपद घेऊन **अबदल्लीला** ठार मारून टाकीन. त्याचा देव त्याला सोडवायाला आला तरी त्याला जिवंत राहूं देणार नाहीं; तो मुसलमान फार उन्मत्त होऊन लोकांस क्रूरपणानें पीडा देतो. ह्यास्तव त्याला तरवारीचा हात दाखवून त्याच्या बायका विधवा करीन, आणि **गिल्ची** लोकांना पाताळीं घालून जमीनदोस्त करून टाकीन; असें जर न करीन तर मी **मराठ्यांचा** बच्चाच नव्हे ! ’ ह्याप्रमाणें अर्थ आहे.

ह्यांत व्यंग्य कांहीं स्पष्ट नसून केवळ ‘ **सक्ती** ’ ‘ **सुस्ती** ’ ‘ **कुस्ती** ’ इत्यादि शब्दरचना मात्र चमत्कारिक आहे म्हणून हें काव्य **चित्र** होय.

* मुसलमानांचा देव.



## आणखी श्लोक (वामनी)

**श्रीमद्राघवहस्तपद्मगुण ये कर्णांत हो जेधवां, ।**
**मोडे हें भवचाप अर्थ इतुका दावी जगीं तेधवां ॥**
**कीं श्रीराम करारविंदगुणही कर्णांत येतां स्वयें, ।**
**मोडे हें भवसायकासन असा भावार्थ हा निश्चयें ॥१॥**

**श्रीरामचंद्रानें** शिवधनुष्याला गुण चढवून तें मोडलें, त्या वेळचें **वर्णन** ह्या श्लोकांत केलें आहे. ह्यांत **रामचंद्र**करगुण कर्णांतीं येतांच म्हणजे **रामचंद्रानें** धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढितांच, **भवचाप** म्हणजे **शिव-धनुष्य** मोडलें; येणेंकरून **रामचंद्र**करगुण कर्णांत येतांच म्हणजे **रामचंद्राचीं** कृत्यें श्रवणीं पडतांच, **भवसायकासन** म्ह० संसाररूप धनुष्य मोडतें, इतका अर्थ लोकांत सूचित केला असा तात्पर्यार्थ आहे. ह्या श्लोकांत व्यंग्य स्पष्ट नाहीं, परंतु अर्थ फार चमत्कारिक आहे म्हणून हें काव्य **चित्र**संज्ञक होय.

## आर्या मोरोपंती

**तूं मलिन कुटिल नीरस, जडहि पुनर्भवपणेंहि कचसाच ।**
**धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि नाम कच साच ॥**

**देवयानीनें बृहस्पतीचा** पुत्र **कच** ह्यास आपला अंगीकार करण्याविषयीं प्रार्थिलें असतां, त्यानें तिचा नकार केला, त्यावेळचें हें तिचें त्याजप्रत वचन आहे. ह्या आर्येंत, 'तुझें नाम कच हें यथार्थ आहे, कारण तूं कचा (केशा) प्रमाणेंच मलिन, कुटिल, नीरस, जड व पुनर्भव असून मस्तकीं धरिला तरी आपला प्रकृतिगुण टाकीत नाहींस' असा भावार्थ आहे. ह्या आर्येंत मलिन, कुटिल, नीरस, जड, पुनर्भव इत्यादि विशेषणें दोहींकडे लागू पडण्याजोग्या अर्थाचीं श्लिष्ट आहेत म्हणून श्लेष अलंकार होऊन अर्थ चमत्कारिक झाला आहे, ह्यांत व्यंग्य कांहीं स्पष्ट दिसत नाहीं म्हणून हें काव्य **चित्रसंज्ञकच** होय.

**प्रश्न.**—पद्मबंध, चक्रबंध, इत्यादि **बंधरूप** कविता असते तीस कशांत गणितात ?

**उत्तर.**—तीहि विचित्र शब्दरनेचाच प्रकार आहे, म्हणून तसल्या कवितेसहि **चित्र**काव्यांतच † गणितात.

† शब्दालंकारांत **चित्र** म्हणून एक प्रकार आहे, तोच हा बंधरूप कवितेंत अलंकार होय.

**प्रश्न.–उत्तम काव्य** अथवा **ध्वनि** ह्याचे भेद किती आहेत ?

**उत्तर.**–१. **अविवक्षितवाच्य**, आणि २. **विवक्षितान्यपरवाच्य** असे मुख्य दोन भेद आहेत.

१. **अविवक्षितवाच्य** हा भेद लक्षणामूलक, आणि २. **विवक्षितान्यपरवाच्य** हा भेद अभिधामूलक होय.

**लक्षणामूलक** जो प्रथम भेद, त्याचे दोन प्रकार आहेत; एक **अर्थांतर-संक्रमितवाच्य**, व दुसरा **अत्यंततिरस्कृतवाच्य**.

अभिधामूलक जो दुसरा भेद त्याचेहि दोन प्रकार आहेत. एक **संलक्ष्य-क्रमव्यंग्य** आणि दुसरा **असंलक्ष्यक्रमव्यंग्य**.

ह्याचे पोटभेद बहुत आहेत, ते विस्तारभयास्तव येथें सांगत नाहीं.

**प्रश्न.–मध्यम** अथवा **गुणीभूतव्यंग्य** जें काव्य, त्याचे प्रकार किती आहेत ?

**उत्तर.–अगूढ, अपरांग, वाच्यसिद्ध्यंग, अस्फुट, संदिग्ध, तुल्यप्राधान्य, काक्वाक्षिप्त**, आणि **असुंदर**, असे आठ आहेत.

**प्रश्न.–चित्र** म्हणून जो काव्याचा तिसरा भेद त्याचे प्रकार किती आहेत ?

**उत्तर.–शब्दचित्र, अर्थचित्र**, आणि **उभयचित्र**, असे तीन आहेत; त्यांत ज्यामध्यें शब्द मात्र चमत्कारिक असतात, तें **शब्दचित्र**; ज्यामध्यें अर्थ मात्र चमत्कारिक असतो तें **अर्थचित्र**; आणि ज्यामध्यें शब्द आणि अर्थ दोन्ही चमत्कारिक तें काव्य **उभयचित्र** होय.

## उदाहरणें

" **फिरविते** रवि ते " इत्यादि, व " **घोडेस्वारची फक्त ह्या मजसवें** " इत्यादिक श्लोक पूर्वी सांगितले आहेत, ह्या श्लोकांत केवळ शब्द मात्र चमत्कारिक आहेत म्हणून तें **शब्दचित्र** होय.

### आणखी श्लोक

**मागे जी लुगडी, सकाप बुगडी, आठा दिसा बांगडी ।**
**घाली ती फुगडी कधी नरगडी, फाडीतसे आंगडीं ॥**
**खैराची सगडी तसी धडधडी, तोंडाळ मोठी फुडी, ।**
**सोन्याचे लगडीस देखुनि गडी, ऐसी महा धांगडी ॥ १ ॥**
**दारा देत कडी, सदा कडकडी, बोले महावांकडी, ।**
**दागे चोरुनी फांकडी नकळतां घेते मुलां कांकडी ॥**

**खाती ती जशि माकडी वसवशी दांतीं दिसे खेंकडी, ।**
**त्या योगें अमृतेश्वरास रुचली गंगातिरीं झोंपडी ।। २ ।।**

**अमृतेश्वर** म्हणून कोणी ब्राह्मण होता, त्याची बायको मोठी दुष्ट व कर्कशा असे, तिच्या त्रासामुळें तो आपलें घर वगैरे संसार सोडून गंगातीरीं झोपडी बांधून तेथें राहिला, त्या बाईच्या वर्णनांचे हे श्लोक आहेत. ह्यांत केवळ शब्दरचना चमत्कारिक आहे. म्हणून हें **शब्दचित्र** होय. अथवा :—

**श्लोक**

**आला मागत शुल्क मुल्कचि मशीरुल्मुल्क बिल्कुल्कसा, ।**
**गर्जोत्कर्ष जितोल्कसा जितबृहब्दद्धोल्क बद्धोल्कसा ।।**
**पल्कामाजि नकल्करीनचिकतल् मुद्दल् कुदल् कार दे,**
**मुल्काचा करुं कल्क खुल्खल अशी हल्कार लल्कार दे ।।**

ह्याहि श्लोकांत व्यंग स्पष्ट नसून केवळ **यवनी, प्राकृत** व **संस्कृत** शब्दांचें मिश्रण असून चमत्कारिक अनुप्रास साधिले आहेत, म्हणून हें **शब्दचित्रच** होय. **अर्थचित्राचें** उदाहरण :

**ओव्या (मुक्तेश्वरकृत)**

**सरला सुकृताचा तंतू ।। आयुष्यतेला झाला अंतू ।।**
**माझिये हस्तीं व्यजनवातू ।। भीमरूपें उदेला ।। १ ।।**
**तो झडपतां सत्वरगती ।। प्राणदीपकपंचक ज्योती ।।**
**मालवोनी पडेल क्षिती ।। गातपात्र पालथें ।। २ ।।**

**जरासंधवधाख्यानांत** ही **जरासंधाप्रत कृष्णाची** उक्ति आहे. हींत सुकृत हीच वात, आयुष्य हेंच तेल इत्यादिक दिव्याच्या अवयवांचीं रूपकें करून विशिष्ट दिव्यांचें रूपक बांधलें आहे. अशा सावयव रूपकालंकाराच्या योगानें अर्थास फारच शोभा आली आहे म्हणून हें **अर्थचित्र** होय.

" **श्रीमद्राघव** " इत्यादि श्लोक व ' **तूं मलिन** ' इत्यादि आर्या मागें लिहिली आहे तींहि अर्थचित्राचीं उहाहरणें होत असें जाणावें.

**श्लोक (वामनी)**

**पृथु नितंब नितंबिनिचा वरी**
**कटितटीं कटिसूत्रचि सांवरीं ।।**

**कनककंकणवृंदहि वाजती,**
**मुखि सुखश्रम बिंदु विराजती ॥ १ ॥**
**श्रवणिंचे श्रवणीं नग हालती,**
**गळति गुंफिलिया शिरिं मालती ॥**
**घुसळितां कुचकुंभहि कांपती,**
**अमृत ज्यांतिल घे कमळापति ॥ २ ॥**

**यशोदा दधिमंथन** करूं लागली, त्या वेळचें हें तिचें वर्णन आहे. ह्यांत ताक करतांना बायकांची जी स्थिति होते ती हुबेहुब वर्णिली आहे, म्हणून हा स्वभावोक्त्यलंकार होऊन शब्दरचनाहि चमत्कारिक आहे, म्हणून हें काव्य **उभयचित्रसंज्ञक होय**. याखेरीज **पद्मबंध**, **चक्रबंध** इत्यादि बंधरूप कविता असते ती चित्रकाव्यच होय, हें मागें सांगितलेंच आहे.

**प्रश्न.**– रचनेच्या संबंधानें काव्याचे किती प्रकार आहेत ?

**उत्तर.**– **गद्यात्मक, पद्यात्मक**, आणि **गद्यपद्यात्मक** असे तीन आहेत.

**प्रश्न.**– **गद्य** म्हणजे काय ?

**उत्तर.**– अक्षरें किंवा मात्रा ह्यांच्या संख्येचा नियम नसतां, केवळ मोकळीं वाक्यें ज्यांत असतात तें **गद्य** होय. जसें;

**" श्रीशंकर पदपंकज भजनांकितांमाजि अग्रेसरें, मृकंड तपोधनाचिया कुमरें, देह गेह मोह त्यजोनि येकेसरें सकल विषय विषासमान मानिले विराग अवसरें, श्रीचंद्रचूड चरणनलिनध्यानाविना नाठवे दुसरें, प्रज्ञेचेनि प्रसरें, दंडधर प्रचंड भय मानोनि षोडश वर्षांतीं गंड समजोनि तांडवाधिश्वराची अखंड आराधना आरंभिली."**

सोळाव्या वर्षीं आपला मृत्यु आहे असें समजून **मार्कंडेय** ऋषीनें **शिवाचें** आराधन आरंभिलें ह्याविषयींचें हें **अमृतराय** कवीनें वर्णन केलें आहे.

## आणखी उदाहरण

**" मग भीम आणि कर्ण हे दोघे जेव्हां वारंवार मोठ्यानें सिंहनाद करीत, तेव्हां त्या मेघगर्जना वाटत. एकमेकांचीं शस्त्रें एकमेकांच्या कवचांवर आपटून जे अग्नि निघत ते विजेसारिखे चमकत, त्यांच्या अंगांपासून जे रक्ताचे असंख्य बिंदु उडत, ते**

**जणु काजवे उडतात असें वाटे; आणि गंभीर शब्द करणारे जे त्यांचे चाप ते मेघ, आणि त्यांजपासून जे हजारों बाण निघत त्या जलधारा असें वाटे; अशा त्या बाणवृष्टीनें जेव्हां दश दिशा भरून गेल्या, तेव्हां हा वर्षाऋतूच काय आला असें वाटे.**

(प. गो. कृ. वेणीसं. नाटक.)

**प्रश्न.**– **पद्य** म्हणजे काय ?

**उत्तर.**– अक्षरें किंवा मात्रा ह्यांच्या संख्येचा नियम ज्यांत असतो, तें **पद्य** होय. जसें **श्लोक, आर्या,** इत्यादिक.

**प्रश्न.**– आणखी दुसऱ्या प्रकारानें **काव्यें** किती प्रकारचीं आहेत ?

**उत्तर.**– दोन प्रकारचीं. १. **श्राव्य** आणि २. **दृश्य.**

**प्रश्न.**– **श्राव्य** काव्यें कोणतीं व **दृश्य** काव्यें कोणतीं ?

**उत्तर.**– १. जीं केवळ ऐकण्याचे किंवा वाचण्याचे मात्र उपयोगीं तीं काव्यें **श्राव्य** होत. **चरित्रें, आख्यानें, उपाख्यानें, कथानकें, गोष्टी, चंपू** इत्यादि प्रकारचीं जीं काव्यें तीं सारीं **श्राव्य** जाणावीं.

**वामनपंडित, मोरोपंत, रघुनाथपंडित, अमृतराय,** इत्यादि प्रसिद्ध महाराष्ट्र कवि होऊन गेले, त्यांचीं काव्यें सर्व ह्याच प्रकारचीं आहेत. त्यांनीं केलेलें दृश्य काव्य कोठें आढळण्यांत आलें नाहीं.

२. प्रयोग म्हणजे खेळ करून पाहाण्याजोगीं जीं काव्यें, तीं **दृश्य** होत, त्यांसच **रूपक** अशी संज्ञा आहे. **प्रकरण** अथवा **महानाटक, नाटक, भाण** इत्यादिक दहा प्रकार **रूपकाचे** आहेत; तसेंच **नाटिका** व **सट्टक** इत्यादिक **उपरूपकें**हि आहेत, इतक्या सर्व प्रकारचीं काव्यें मराठींत आढळत नाहींत, म्हणून त्यांचीं लक्षणें वगैरे येथें सांगितलीं नाहींत.

**प्रश्न.**– ह्याशिवाय आणखी दुसऱ्या तऱ्हेचे कांहीं भेद आहेत काय ?

**उत्तर.**– होय; **महाकाव्य, उपकाव्य, क्षुद्रकाव्य, खंडकाव्य,** इत्यादिक अनेक भेद आहेत, ते विस्तारभयास्तव येथें सांगत नाहीं.

**प्रश्न.**– काव्यास मनुष्याची उपमा देतात हें कसें ?

**उत्तर.**– तें ठीकच आहे; कां कीं **देह, आत्मा, स्वभाव, रीति, गुण, दोष, अलंकार,** जसे **मनुष्यास** असतात, तसे **काव्यास**हि आहेत, म्हणून त्याची त्यास उपमा देतात.

**प्रश्न.– काव्याचे** देहादिक कोणते ?

**उत्तर.– शब्द** आणि **अर्थ** एतद्रूप काव्याचा **देह** होय; **रस** हा काव्याचा **आत्मा; वैदर्भी** इत्यादिक रीति हा काव्याचा **स्वभाव; कैशिकी** इत्यादिक वृत्ति ह्या काव्याच्या **वृत्ति; माधुर्य, ओज, प्रसाद** हे काव्याचे **गुण; कर्णकटुत्व, अपुष्टत्व,** इत्यादिक हे काव्याचे **दोष, अनुप्रास, उपमा** इत्यादिक हे काव्याचे **अलंकार** होत; ह्याखेरीज काव्याच्या ठायीं **शय्या, द्राक्षा** आणि **नारिकेल** इत्यादि **पाक**हि काव्यवेत्त्यांनीं सांगितले आहेत; परंतु त्यांचें सविस्तर निरूपण करण्यास ह्या संक्षिप्त **ग्रंथांत** अवकाश नाहीं.

**प्रश्न.– काव्याचा** उपयोग काय आहे ?

**उत्तर.– काव्याच्या** योगानें **कवी**ला कीर्ति आणि द्रव्य ह्यांची प्राप्ति होते, व इतर लोकांचें मनोरंजन होऊन त्यांस सन्मार्गानें वागावें, कुमार्गानें वागूं नये इत्यादिक उपदेश सहज व अनायासानें प्राप्त होतो. ह्याप्रमाणें **काव्या**पासून अनेक लाभ होतात.

**प्रश्न.–** काव्य करितां येण्यास काय काय साधनें लागतात ?

**उत्तर.–** १. स्वाभाविक **कविताशक्ति;** २. सृष्टींतील पदार्थांची व व्याकरण, छंद इत्यादि शास्त्रांची व महाकविकृत काव्यांची व इतिहासांची **पूर्ण माहिती;** ३. सहृदय व रसिक असे जे काव्यवेत्ते पुरुष, ह्यांच्या शिक्षेप्रमाणें काव्य रचण्याचा वगैरे **अभ्यास करणें,** ह्या तीन गोष्टी एकत्र झाल्या म्हणजे उत्तम काव्य करितां येतें.

———

# प्रकरण दुसरें

## अभिधा, लक्षणा आणि व्यंजना

**प्रश्न.**– शब्द म्हणजे काय ?

**उत्तर.**– एक अक्षर, किंवा अनेक अक्षरांचा समुदाय, ज्यापासून कांहीं अर्थाचा बोध होतो, त्यास **शब्द** असें म्हणतात.

**प्रश्न.**– अर्थबोधकत्वसंबंधानें **शब्दाचे** प्रकार किती आहेत ?

**उत्तर.**– तीन. १. **वाचक**, २. **लक्षक** आणि **व्यंजक.**

**प्रश्न.– वाचक**शब्द कोणास म्हणतात ?

**उत्तर.– ज्या शब्दा**पासून ज्या अर्थाचा नियमेंकरून बोध होतो, तो **शब्द** त्या अर्थाचा **वाचक** होय. आणि जो अर्थ त्या **वाचक**शब्दानें बोधित केला असतो, तो अर्थ त्या शब्दाचा **वाच्यार्थ** होय; त्यासच **शक्यार्थ, मुख्यार्थ, स्वार्थ,** असेंहि म्हणतात. (ह्या व्यापारास **शक्ति** अथवा **अभिधावृत्ति** असें नांव आहे.) उदाहरण "घट" ह्या शब्दापासून पात्रविशेषाचा नियमेंकरून बोध होतो, म्हणून "घट" हा पात्रविशेषाचा **वाचक,** आणि पात्रविशेष हा त्याचा **वाच्यार्थ** होय.

**प्रश्न.– लक्षक**शब्द कोणास म्हणतात.

**उत्तर.**– जेव्हां कोणा शब्दाचा **वाच्यार्थ** म्हणजे **मुख्यार्थ,** हा वाक्याच्या तात्पर्यार्थास बाधित असल्यामुळें अन्वित होत नाहीं; तेव्हां वाक्यार्थाशीं जुळण्यासारखा त्या शब्दाचा अर्थ कल्पावा लागतो; त्या अर्थास त्या शब्दाचा **लक्ष्यार्थ** म्हणतात, व त्या शब्दास त्या अर्थाचा **लक्षक** म्हणतात. (ह्या शब्दव्यापारास **लक्षणा**वृत्ति असें नांव आहे. उदाहरण. "**पेंढाऱ्यांच्या भयानें सारा गांव पळाला.**" येथें 'गांव' ह्या शब्दाचा **वाच्य** म्हणजे **मुख्य** अर्थ प्रदेशविशेष होय, त्याला ( प्रदेशविशेषाला ) पळणें संभवत नाहीं, म्हणून गांवशब्देंकरून तत्संबंधानें त्यांतील रहाणारे लोक घ्यावे लागतात, त्याजकरितां, **गांव** हा शब्द लोक ह्या अर्थाचा **लक्षक,** आणि **लोक** हा त्याचा **लक्ष्यार्थ** होय.

**लक्षणा** होण्याचीं कारणें दोन आहेत; **रूढि**† अथवा **प्रयोजन.** "**पेंढाऱ्यांचे** भयानें **सारा गांव** पळाला." ह्या उदाहरणांत जी **लक्षणा** झाली ती रूढीमुळें होय.

**प्रश्न.–** **व्यंजक**शब्द कोणास म्हणतात ?

**उत्तर.–** **वाच्य** आणि **लक्ष्य** ह्या दोनहि अर्थांहून वेगळ्याच अर्थाची ज्या शब्दापासून प्रतीति होते तेव्हां तो शब्द त्या अर्थाचा **व्यंजक,** आणि तो अर्थ त्या शब्दाचा **व्यंग्यार्थ** होय. उदाहरण. "**कृष्णेंद्रस्वामीचा** मठ **काशीमध्यें भागीरथीवर** आहे." येथें **भागीरथी** ह्या शब्दाचा वाच्यार्थ जो जलप्रवाह, त्यावर मठ असण्याचा संभव होत नाहीं, म्हणून **लक्षणें**करून भागीरथी शब्दानें भागीरथीसंबंधीं तीराचें ग्रहण करावें लागतें. आतां मठाचें **शीलतत्व** आणि **पवित्रत्व** ह्यांचे उत्कर्षाची जी मनाला प्रतीति होते, ती भागीरथी ह्या शब्दाचा **व्यंग्यार्थ** होय; व **भागीरथी** हा शब्द त्या व्यंग्यार्थाचा **व्यंजक** होय. ह्या शब्द व्यापारास **व्यंजनावृत्ति** असें नांव आहे.

ह्या वरील '**कृष्णेंद्रस्वामी**' इत्यादि उदाहरणांत जी लक्षणा केली ती मठाचें **शैत्य** व **पावनत्व** ह्यांच्या अतिशयाची प्रतीति व्हावी ह्या प्रयोजनास्तव केली.

**प्रश्न.–** **लक्षणा** होते ती किती प्रकारांनीं होते ?

**उत्तर. –** **वाच्यार्था**च्या सादृश्यांवरून, आणि **वाच्यार्था**च्या संबंधावरून अशा दोन प्रकारांनीं होते. उदाहरण. "बाळ्या केवळ बैल आहे." एथें बैलाचे जे बुद्धिमांद्यादि गुण ( गुण म्हणजे धर्म ) ते बाळाच्या अंगीं असल्यावरून बाळ्या हा बैल म्हणजे बैलासारखा आहे असा अर्थ होतो, म्हणन ही **सादृश्यनिबंधनालक्षणा** होय. हिलाच कोणी **गौणीवृत्ति** असेंहि म्हणतात. "**पेंढाऱ्याच्या** भयानें **सारा गांव** पळाला" ह्या उदाहरणांत **गांव** शब्दानें गांवसंबंधीं राहाणारे **लोक** ह्यांचे ग्रहण करावें लागतें; आणि "**कृष्णेंद्रस्वामी**चा मठ **काशीमध्यें भागीरथीवर** आहे." ह्या उदाहरणांत **भागीरथी** शब्दें करून तत्संबंधीं **तीराचें** ग्रहण करावें लागते, म्हणून ह्या दोन्ही **संबंधनिबंधनालक्षणा** होत.

---

† रूढीमुळें जी होते तिला **निरूढलक्षणा** व प्रयोजनामुळें जी होते तिला **प्रयोजनवतीलक्षणा** असें म्हणतात.

**प्रश्न.**– **संबंधनिबंधनालक्षणा** किती प्रकारची आहे ?

**उत्तर.**– **जहत्स्वार्था** आणि **अजहत्स्वार्था** अशी दोन प्रकारची आहे.

**प्रश्न.**– **जहत्स्वार्था** कोणती व **अजहत्स्वार्था** कोणती ?

**उत्तर.**– १. जेव्हां **वाच्यार्था**चा अन्वय वाक्यांत होत नाहीं, त्यांचा सर्वथा त्याग होतो, तेव्हां ती **जहत्स्वार्था** जाणावी. जसें; '**पेंढाऱ्यांच्या भयानें सारा गांव** पळाला,' ह्या उदाहरणांत **गांव** ह्या शब्दांचा **वाच्यार्थ** जो प्रदेशविशेष, त्याचा सर्वथा त्याग होऊन तत्संबंधीं लोकांचाच क्रियेशीं अन्वयहोतो, म्हणून ही **जहत्स्वार्था** होय.

२. जेव्हां **लक्ष्यार्था**बरोबर **वाच्यार्थाचा**हि अन्वय होतो, तेव्हां **अजहत्स्वार्था** जाणावी. जसें; "एथें दहीं ठेविलें आहे, कावळा आला तर हांक" ह्या उदाहरणांत 'कावळा' ह्या शब्दानें पक्षिविशेषाचें ग्रहण होऊन त्याशिवाय **जे** कोणी दह्यांचे **नाशक** प्राणी, त्याचेंहि ग्रहण होतें. कां कीं, **कावळ्या**सच हांकून दे, दुसऱ्यांस नको, अशी सांगणाऱ्याची विवक्षा नाहीं, म्हणून ही **अजहत्स्वार्था** होय.

ह्याखेरीज **जहदजहत्स्वार्था** म्हणून एक तिसरा भेद कोणी मानितात, त्यांत कांहीं अंशीं वाच्यार्थाचा त्याग होऊन कांहीं अंशीं लक्ष्यार्थाबरोबर त्याचा अन्वय होतो म्हणून तिला तसें नांव ठेविलें आहे. **श्रीशंकराचार्यप्रभृति अद्वैतवादी** हे "तत्त्वमसि म्हणजे तें तूं आहेस" ह्या वाक्यावरून **जीवात्मा** आणि **परमात्मा** ह्यांचें ऐक्य सिद्ध करितात, तें ह्याच **जहदजहत्स्वार्थालक्षणे**करून होय. हिलाज कोणी **भागलक्षणा** किंवा **भागत्यागलक्षणा** असें म्हणतात.

**प्रश्न.**– शब्दाप्रमाणें अर्थालाहि **व्यंजकता** आहे काय ?

**उत्तर.**– होय, कधीं कधीं अर्थालाहि **व्यंजकता** असते खरी. जसें १. "अरे **वाघ रे वाघ !**" ह्या वाक्यावरून वाघाच्या निवारणार्थ कोणी तरी धांवा असा बोध होतो. २. "अरे पंतोजी आले !" ह्या वाक्यावरून खेळूं नका, अभ्यास चालूं द्या असा बोध होतो. ३. "अरे दहा वाजले !" ह्या वाक्यावरून कचेरींत वगैरे जाण्याची वेळ झाली असा बोध होतो.

**प्रश्न.**– **लक्षणे**चे आणखी कांहीं प्रकार आहेत काय ?

**उत्तर.**– होय, **लक्षितलक्षणा**, **विपरीतलक्षणा**, इत्यादिक प्रकार आहेत. जसें;



१. **द्विरेफ** ह्या पदापासून भोंवऱ्याचा बोध होतो तो **लक्षितलक्षणेनें** म्हणजे द्विरेफ ह्या शब्दानें ज्यांत दोन रेफ आहेत असें **भ्रमर** हें पद लक्षित केलें, व भ्रमर ह्या पदानें भोंवऱ्याचा बोध करून दिला. २. "तूं फार **शहाणा** आहेस" ह्या वाक्यावरून '**शहाणा**' म्हणजे **मूर्ख** असा अर्थ जेव्हां विवक्षित असतो, तेव्हां ती, **विपरीतलक्षणा** जाणावी. ह्याप्रमाणेंच 'आम्ही जातों, ह्याबद्दल 'आम्ही येतों' असें कोणी कोणी बोलतात, तसेंच हळद, कुंकूं इत्यादि सौभाग्यद्रव्य संपलें असतां त्यास संपलें म्हणणें हें बायकांच्या कोमल व अमंगलभीरु हृदयास कठोर व अमंगल वाटतें म्हणून त्या तसल्या प्रसंगीं 'संपलें' ह्याबद्दल '**वाढलें**' असें म्हणतात. असें "पंचपाळयांतील कुंकूं **वाढलें** आहे, त्यांत दुसरें घाल." "हातांतील कांहीं बांगड्या **वाढल्या** होत्या म्हणून त्यात पुरवठा भरला." इत्यादि. ही **विपरीतलक्षणाच** होय.

असेच कितीएक शब्द लाक्षणिक असून त्यांची वाचकाप्रमाणें प्रयोग करण्याची रूढी पडली आहे. जसें; १. **वाटाघाट**, २. आटापिटा, ३. **तोडजोड**, ४. **चलबिचल**, ५. **पाटावरवंटा** इत्यादि.

१. **वाटाघाट**. पुरण शिजलें असतां तें मृदु व बारीक करण्यासाठीं त्याला घाटणें व वाटणें हे दोन संस्कार करावे लागतात, हा 'वाटाघाट' शब्दाचा मुख्य म्हणजे **वाच्य अर्थ** होय. आतां तोच 'वाटाघाट' शब्द कांहींएक गोष्टीचा ऊहापोह करण्याचे प्रसंगीं उपयोगांत आणण्याची रूढि पडली आहे. जसें; "विद्याखातें वाढविण्याविषयीं सरकारांत वाटाघाट चालली आहे."

२. **आटापिटा**. सोन्याचें **आटणें** व **पिटणें** एतत्संस्काररूप जी क्रिया, ती **आटापिटा** ह्या शब्दाचा मुख्य अर्थ असून सांप्रत क्षम किंवा कष्ट भोगणें अशा ठिकाणीं त्याचा उपयोग करण्याची रूढी पडली आहे. जसें; "मुलें हट्टी व दुर्गुणी असलीं म्हणजे त्यांस सुशिक्षित करण्याविषयीं आईबापांच्या जीवाचा आटापिटा होतो."

३. **तोडजोड**. सुतार हा आपल्यास पाहिजे त्या बेताचीं लांकडें तोडून जोडतो, ह्यापासून **तोडजोड** हा शब्द निघाला असून हल्लीं कांहींएक गोष्टींविषयीं तंटा वगैरे पडल्यामुळें बनत नसल्यास, युक्तीनें परस्परांचा जम बसविणें अशा अर्थीं ह्या शब्दाचा प्रयोग करितात. जसें; "**रामराव** आणि

**कृष्णराव** ह्यांच्यामध्यें तंटा पडला असतां **गणपतराव** ह्यांनीं मध्यें पडून त्यांची **तडजोड** केली. "

४. " **चलबिचल.**" हा " चल वे चल " ह्या **यवनी** भाषेंतील वाक्याचा अपभ्रंश आहे असें दिसतें. ह्याचा अर्थ " चाल रे चाल " असा आहे. **शिपाई चाकर** इत्यादिक, **सरकार सावकार** इत्यादिकांकडून **गुन्हेगार, कुळें** वगैरेंस धमकी देऊन बोलावणें कर्तव्य असतां याचा 'चाल रे चाल' ह्याच मुख्यार्थी प्रयोग करितात; परंतु मनाची वगैरे चंचळता, धैर्यच्युति, गडबड इत्यादिक होणें ह्या अर्थीं त्याचा उपयोग करण्याची रूढि पडली आहे. जसें; " **दयाराम आत्माराम** ह्याच्या दुकानाचें दिवाळें निघाल्यापासून इतर सावकारांची '**चलबिचल**' झाली."

**५. पाटावरवंटा.**– हा शब्द कांहीं पदार्थ वाटून त्याचें चूर्ण किंवा चटणी करण्याच्या साधनाचा वाचक असून हल्लीं देशादिकांची उद्वस्तता, नाश, दुर्दशा होणें, करणें इत्याद्यर्थी योजण्याची रूढि आहे. जसें; " कौरव आणि पांडव यांचें वैर लागून शेवटीं जें महाभयंकर युद्ध झालें, त्या योगानें त्या काळच्या बहुतेक विख्यात राजमंडळांचा पाटावरवंटा झाला ?" याप्रमाणेंच **ओढाताण, चलबुलाई, भवतिनभवति, हंचत्वंच** इत्यादि शब्द जाणावे.

**प्रश्न.**– कितीएक जोडशब्द रूढींत आहेत, त्यांचा अर्थ कसा होतो ?

**उत्तर.**– १. कितीएक शब्दांच्या पुढें त्यांचे पर्यायशब्द जोडून बोलण्याची रूढि आहे. तसल्या ठिकाणीं पहिल्या शब्दाचा जो अर्थ त्या अर्थाशीं समानधर्मक अशा इतर अर्थांचा संग्रह त्यांच्यापुढें जोडलेल्या पर्यायानें **जसा, इत्यादि, वगैरे,** इत्यादि शब्दांनीं होतो तसा होतो.

उदाहरण, 'उद्यां **पूजाअर्चा** आटपून मी तुमच्या भेटीस येईन.' येथें **पूजाअर्चा** ह्या जोडशब्दांतील **अर्चा** ह्या **पूजा**शब्दाच्या पर्याय शब्दानें **पूजेशीं** समानधर्मक जीं जप इत्यादि नित्यकर्में, त्यांचा संग्रह झाला. म्हणून **पूजाअर्चा** म्हणजे **पूजा इत्यादि** अथवा **पूजावगैरे** असा अर्थ वृद्ध होतो. ही **निरूढलक्षणा** होय.

२. कितीएक शब्दांपुढें **पाणी** हा शब्द जोडिल्यानें पूर्वोक्त समानधर्मक इतर पदार्थांचा बोध होतो. जसें " रोग्यांस **औषधपाण्याची** तजवीज चांगली

असली पाहिजे." एथें '**औषधपाणी**' ह्या शब्दांतील '**पाणी**' ह्या शब्दानें औषधासारिखेच जे दुसरे पदार्थ त्यांचा बोध होतो.

३. कितीएक शब्दांपुढें वर लिहिलेले पर्याय किंवा पाणी ह्या शब्दाहून वेगळेच शब्द जोडले असतात, तेव्हांहि **तत्समानधर्मक, तदादि** अशाच अर्थाचा बोध होतो. जसें, 'भाजीपाला' इत्यादि.

४. प्रत्येक शब्दाचें जें आद्याक्षर, त्याच्या ठिकाणीं **बी** किंवा **गी हें अक्षर** घालून तो शब्द पुढें जोडून बोलण्याची रूढि आहे. तेव्हांहि वर सांगितलेलाच अर्थ होतो. जसें, "नारळबिरळ" "नारळगिरळ" म्हणजे नारळ वगैरे.

५. कितीएक शब्दांच्या आरंभींच्या अक्षरांच्या ठिकाणीं दुसरींच अक्षरें घालून ते शब्द पुढें जोडून बोलण्याची रूढि आहे, तेव्हांहि पूर्वोक्तच अर्थ होतो. जसें; **माणूसकाणूस, भांडेंकुंडें**, **पोरसोर** इत्यादि.

६. कितीएक जोडशब्दांतील उत्तरशब्द केवळ वाक्यालंकाराप्रमाणें शोभार्थ असतो, तेणेंकरून **विशेष** अर्थाचा बोध न होतां **स्वार्थाचाच** बोध होतो. जसें; "**केरकचरा** झाडून टाकावा," "**खर्चवेंच** जपून करावा," इत्यादि स्थलीं **केरकचरा** शब्दानें **केर**, **खर्चवेंच** शब्दानें **खर्च** याचाच बोध होतो.

कितीएक जोडशब्द असे आहेत. पूजाअर्चा, लांकुडफाटें, दगडधोंडा, शाकभाजी, केरकचरा, चिरगुटपांघरूण, गुरूंढोर, खर्चवेंच, उदकपाणी, शेटसावकार, भाजीपाला, ताकपाणी, स्वयंपाकपाणी, पथ्यपाणी, पाउसपाणी, पीकपाणी, कुणबीधुणबी, कोळीमाळी, दाणादुणा, धान्यधुन्य, भांडेकुंडें, माणूसकाणूस, वेलवाख, झाडझुडूप, कांटेकुटे, म्हाताराकोतारा, पोरसोर, तेलीतांबोळी, अडाणीकाबाडी, वैद्यवाणी, पोथीपुस्तक, मुलेंबाळें, जेवणखाण इत्यादि.

७. दहादां, सतरादां, पंचवीसदां, पन्नासदां, शंभरदां हजारदां, लाखदां, कोटदां ह्या शब्दांचा **वाच्य** अथवा **मुख्य** अर्थ विवक्षित नसून हे शब्द '**बहूत वेळां**' ह्या अर्थाविषयीं रूढींत पडले आहेत. जसें; "मी त्यास दहादां सतरादां इत्यादि सांगितलें, तरी त्यानें ऐकलें नाहीं." एथें **दहादां सतरादां** इत्यादिकांचा अर्थ नक्की दहा वेळाच सतरा वेळाच नव्हे, तर 'बहुत वेळां' असा होय.

८. **कमज्यास्ती, अधिकउणें, थोंडेंबहुत**, ह्या शब्दांतील '**कम, उणें,**

**बहुत,**' ह्या शब्दांचा अर्थ क्वचित् विवक्षित नसून कधीं कधीं ते शब्द वाक्यालंकाराप्रमाणें शोभार्थ उपयोगांत आणिलेले असतात. जसें; "तूर्त शंभर रुपये देतों, याहून दहापांच कमज्यास्ती लागल्यास मागाहून देईन." एथे कमज्यास्ती म्हणजे **ज्यास्ती** असा अर्थ होतो. कोणी कमज्यास्ती म्हणजे किंचित् ज्यास्ती असेंहि म्हणतात. जसें; "तूर्त शंभर देतों, कमज्यास्ती लागल्यास मागून देईन." एथें कमज्यास्ती म्हणजे किंचित् ज्यास्ती असा अर्थ होतो. "मी तूर्त शंभर देतों तेवढे घे, **थोडेबहुत** रावजीहि देतील." एथें थोडेबहुत म्हणजे **थोडेसे** असा अर्थ होतो.

९. दहापांच, दहावीस, पांचपंचवीस, पांचपन्नास, शेंपन्नास, हजारपांचशें, अशा शब्दांतील अधिक संख्यावाचकाचें प्राधान्य विवक्षित असून सरासरी, सुमारें, कमकसर, तितके किंवा तोंपर्यंत असा अर्थ बोधित होतो; त्यांतील न्यूनसंख्यावाचकाच्या अर्थाशीं तात्पर्य नसतें. जसें; "त्याला महिन्याच्या कांठीं पांचपंचवीस रुपये सहज मिळतात." एथें सरासरी पंचवीस किंवा पंचवीसपर्यंत असा अर्थ **पांचपंचवीस** ह्या शब्दाचा होतो. असेच दुसरेहि रूढ शब्द व्यवहारावरून जाणावे.

---

# प्रकरण तिसरें

## नायक आणि नायिका

**प्रश्न.– नायक** कोणास म्हणतात ?

**उत्तर.–** काव्यांत मुख्यत्वेंकरून ज्या पुरुषाचें वर्णन केलेलें असतें त्या पुरुषास त्या काव्याचा **नायक** असें म्हणतात. जसें; **रामायण** ह्या काव्यांत **रामचंद्र** हा नायक होय.

**नायकाच्या** बरोबरीचा जो प्रतिस्पर्धी तो **प्रतिनायक** होय. जसा त्याच काव्यांत **रावण.**

**प्रश्न.–** लोकोत्तर नायकाच्या अंगीं कोणते गुण असतात ?

**उत्तर.–** महाकुलीनता, महाभाग्य, औदार्य, तेजस्विता, चातुर्य, धार्मिकपणा इत्यादिक अनेक गुण असतात.

**प्रश्न.–** गुणपरत्वें **नायकाचे** प्रकार किती आहेत ?

**उत्तर.–** १. **धीरोदात्त,** २. **धीरोद्धत,** ३. **धीरललित,** ४. **धीरप्रशांत,** असे चार प्रकार आहेत.

**प्रश्न.–** ह्यांतून प्रत्येक **नायकाचे** गुण कोणते असले म्हणजे त्यास काय म्हणतात तें सांगावें.

**उत्तर.–** १. महासत्वशील, अतिगंभीर, दयाशील, आत्मश्लाघा न करणारा असा जो नायक तो **धीरोदात्त** होय. जसें; **रामचंद्र, युधिष्ठिर,** इत्यादि.

२. ज्याला गर्व आणि ईर्षा फार, व ज्याचा स्वभाव तामस, व जो आत्मश्लाघा करणारा, व ज्याला कोप लौकर येतो, तो नायक **धीरोद्धत** होय. जसा, **भीमसेन** इत्यादि.

३. चितारहित, कलासक्त, सुखशाली असा जो **नायक,** तो **धीरललित** होय. जसा, **रत्नावलींतील वत्सराजा** इत्यादि.

४. जो धीर, शांतियुक्त, व ज्याचें चित्त प्रसन्न असतें, तो **नायक धीर-प्रशांत** होय. जसा, **मालतीमाधवांतील माधव, मृच्छकटींतील चारुदत्त** इत्यादि.

**प्रश्न.– शृंगारविषयक** नायक किती प्रकारचे आहेत ?

**उत्तर.**– चार प्रकारचे :

१. **अनुकूल** म्हणजे स्त्रीच्या ठायीं विशेष आसक्त.

२. **दक्ष** म्हणजे सर्व स्त्रियांवर सारखी प्रीति करणारा.

३. **धृष्ट** म्हणजे अपराधी असून निर्भय असणारा.

४. **शठ** म्हणजे गूढपणें वंचना करणारा.

**प्रश्न.**– **शृंगारविषयक** नायकाचे सहाय कोणते ?

**उत्तर.**– **पीठमर्द, विदूषक, विट, चेट, शकार** इत्यादि.

**प्रश्न.**– **नायिका** कोणास म्हणतात ?

**उत्तर.**– काव्यांत मुख्यत्वेंकरून ज्या स्त्रीचें वर्णन केलेलें असतें, किंवा जी मुख्य नायकाची मुख्य स्त्री, अथवा ज्या स्त्रीविषयीं **नायक** अत्यंत आसक्त झाला असतो, ती स्त्री **नायिका** होय. **जानकीपरिणय**-नाटकांत **जानकी, शाकुंतल** नाटकांत **शकुंतला, मृच्छकटिक** नाटकांत **वसंतसेना**, इत्यादि नायिका प्रसिद्ध आहेत.

**प्रश्न.**– शृंगारविषयक **नायिका** किती प्रकारच्या आहेत ?

**उत्तर.**– १. **स्वाधीनपतिका** (पतीची लाडकी), २. **वासकसज्जिका** (वस्त्रालंकारादिकांनीं भूषित होऊन बसलेली), ३. **विरहोत्कंठिता** (विरहानें उत्कंठित झालेली), ४. **विप्रलब्धा** (पतीनें फसविलेली), ५. **खंडिता** (दुसऱ्या स्त्रीकडे पति गेला म्हणून ईर्षायुक्त झालेली), ६. **कलहांतरिता** (पतीशीं कज्या करून पश्चात्ताप पावलेली), ७. **प्रोषितभर्तृका** (जिचा पति प्रवासास गेला असतो ती), ८. **अभिसारिका** (कामानें उत्कंठित होऊन स्वत: नायकाकडे जाणारी). अशा आठ प्रकारच्या आहेत.

**प्रश्न.**– ह्यांस **नायक** अनुकूळ करून घेण्याविषयीं साहाय्य करणाऱ्या कोण ?

**उत्तर.**– दूती, दासी, सखी, चेटी, धात्री, (दायी), शेजारीण, तांबोळीण, माळीण इत्यादिक.

**प्रश्न.**– वय:परत्वें नायिकांचे भेद किती ?

**उत्तर.**– १. **मुग्धा**, २. **मध्या** आणि ३. **प्रौढा** असे तीन आहेत.

**प्रश्न.**– त्यांचीं प्रत्येकीं लक्षणें सांगावीं.

**उत्तर.**– १. जिला तारुण्य येण्यास नुक्ताच आरंभ झाला असून लज्जा फार असते ती **मुग्धा**. २. जिला बरेंच तारुण्य आलें असून जिच्या अंगीं लज्जा

व काम ह्यांचें समानत्व असतें ती **मध्या.** ३. जिच्या अंगीं पूर्ण तारुण्य आलें असून जिचा लाजाळूपणा अगदीं गेला असतो ती **प्रौढा.**

**प्रश्न.**– आणखी कांहीं प्रकारें **नायिकांचे** भेद आहेत काय ?

**उत्तर.**– होय. **स्वकीया** म्हणजे स्वस्त्री, आणि **परकीया** म्हणजे परस्त्री, असे दोन भेद आहेत.

**प्रश्न.**– **स्त्रियांच्या** व **पुरुषांच्या** कांहीं जाति आहेत असें म्हणतात, त्या कोणत्या ?

**उत्तर.**– **पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी, हस्तिनी,** अशा चार जाति स्त्रियांच्या आणि **शश, मृग, वृष, वाजी** अशा चार जाति पुरुषांच्या, कामशास्त्रांत प्रसिद्ध आहेत; त्यांचीं लक्षणें वगैरे अगत्य असल्यास तेथें पाहावीं.

---

# प्रकरण चौथें

## रस, भाव इत्यादि

**प्रश्न.– रस** म्हणजे काय ?

**उत्तर.– प्रीति, हास्य, शोक, क्रोध, उत्साह, भय,** इत्यादि ज्या मनोवृत्ति, त्या उत्कट अवस्थेप्रत पावल्या असतां त्यांना **रस** असें म्हणतात.

**प्रश्न.– रसाचें** लक्षण **शास्त्रीय** परिभाषेनें कसें ?

**उत्तर.– विभाव, अनुभाव** आणि **व्यभिचारीभाव** ह्यांच्या योगानें व्यंजित झाला जो **स्थायीभाव** त्यास **रस** म्हणावें, असें **शास्त्रीय** परिभाषेनें रसाचें लक्षण जाणावें.

**प्रश्न.– रस** किती प्रकारचे आहेत ?

**उत्तर.– १. शृंगार** (स्त्रीपुरुषांमधली प्रीति), २. **हास्य** (हांसें), ३. **करुण,** ४. **वीर,** ५. **रौद्र,** ६. **भयानक,** ७. **बीभत्स,** ८. **अभ्दुत,** आणि ९. **शांत,** असे नऊ प्रकारचे आहेत.

**प्रश्न.– स्थायीभाव** म्हणजे काय ?

**उत्तर.– विभाव, अनुभाव** आणि **व्यभिचारीभाव** ह्यांच्या योगानें व्यक्ततेप्रत आल्यानें ज्या मनोविकारास **रस** असें म्हणतात, तोच मनोविकार **स्थायी-भाव** होय. तो १. **रति,** (प्रीति), २. **हास, ३. शोक, ४. क्रोध, ५. उत्साह,** (आवेश, हौस), ६. **भय,** ७. **जुगुप्सा,** (कंटाळा, चिळस), ८. **विस्मय,** (आश्चर्य), ९. **शम** (शांति), असा नऊ प्रकारचा आहे, त्यांतून एक-एक **रसाला** एकएक **स्थायीभाव** आहे. ह्याप्रमाणें नऊ रसांना नऊ स्थाथीभाव आहेत.* कोणत्या **रसाचा** कोणता **स्थायीभाव** हें पुढील कोष्टकावरून समजेल.

**प्रश्न.**–ह्या रसांशिवाय आणखी एखादा रस आहे काय ?

**उत्तर.**–होय, कोणाच्या मतानें **वत्सल** म्हणून एक दहावा रस आहे. तो व त्याचा **स्थायीभाव** वगैरे पुढील कोष्टकांत सांगितलें आहे.

---

* शृंगारादि रसाचे जे स्थायीभाव सांगितले ते तदितर रसांत आले असतां व्यभिचारीभाव होतात. जसें शृंगाररसांत हास; वीररसांत क्रोध; शांतरसांत जुगुप्सा; हे व्यभिचारी होतात. असेंच इतरांचेंहि तर्कानें जाणावें.

**प्रश्न.**—**विभाव** म्हणजे काय ? व ते किती प्रकारचे आहेत ?

**उत्तर.**—**रसाच्या** उत्पत्तीविषयीं जीं विशेष कारणें ते **विभाव** होत; ते दोन प्रकारचे आहेत. **१. आलंबनविभाव.** आणि **२. उद्दीपनविभाव.**

**प्रश्न.**—**आलंबनविभाव** कोणते व **उद्दीपनविभाव** कोणते ?

**उत्तर.**—१. ज्याला आलंबून रसाची उत्पत्ति होते ते **आलंबनविभाव** होत. जसें; **शृंगाररसांत** नायक, नायिका इत्यादि; **हास्यरसांत** विदूषक इत्यादि. २. ज्यांच्या योगानें रसाचें उद्दीपन होतें ते **उद्दीपनविभाव** होत. जसें; शृंगाररसांत चंद्रोदय, उद्यान, कोकिलशब्द, स्त्रीविलास इत्यादि; हास्यरसांत **विदूषकाच्या** चेष्टा इत्यादि.

**प्रश्न.**—**अनुभाव** कोणास म्हणतात ?

**उत्तर.**—मनोगतभावाच्या सूचक अशा कटाक्ष, भुजक्षेप इत्यादिक कार्यरूप ज्या शरीरचेष्टा, त्यांस **अनुभाव** म्हणतात.

**प्रश्न.**— **व्यभिचारीभाव** कोणास म्हणावें ?

**उत्तर.**—**रसाच्या** उत्पत्तीस साहाय्यकारी असे जे **निर्वेद, ग्लानि, शंका, असूया** इत्यादिक, ते **व्यभिचारीभाव** होत. ते एकंदर ३३ ( तेहेतीस ) आहेत. यांस **संचारीभाव** असेंहि म्हणतात.

**प्रश्न.**—याखेरीज सात्विकभाव आहेत ते कोणते ?

**उत्तर.**— **१. स्तंभ, २. प्रलय, ३. रोमांच, ४. स्वेद, ५. वैवर्ण्य, ६. वेपथु, ७. अश्रु ८. वैस्वर्य** असे आठ **सात्विकभाव** आहेत. सुखादिभावानें भावित जें अंतःकरण तें सत्व होय, त्यापासून हे भाव उत्पन्न होतात म्हणून त्यांस सात्विकभाव असें म्हणतात. त्या सात्विकभावांचा अंतर्भाव प्रायः अनुभावांतच करितात.

**प्रश्न.**—**भाव** कोणास म्हणतात ?

**उत्तर.**—**विभाव** आणि **अनुभाव** ह्यांच्या योगानें व्यक्त झालेला जो **निर्वेदादिक** व्यभिचारीभाव; आणि **देव, गुरु, राजा,** इत्यादिविषयक ‡**रतिरूप**

‡ एथें रतिरूप स्थायीभाव सांगितला तो हास्यादि इतरहि अपुष्ट स्थायीभावांचें उपलक्षण होय. सारांश इत्यादि स्थायीभाव उत्कट पुष्टतेप्रत पावला म्हणजे रसरूप होतो व तोच अपुष्टतेप्रत पावला म्हणजे भावरूप होतो असें जाणावें.

जो स्थायीभाव त्यास **भाव** म्हणतात.

**प्रश्न.– रसाभास** व **भावाभास** कोणास म्हणावें ?

**उत्तर.**–अनुचितपणानें प्रवृत्त जो **रस** आणि **भाव** त्यास क्रमानें **रसाभास** व **भावाभास** असें म्हणावें. जसें, **नीच म्लेच्छादिक** किंवा **पशुपक्ष्यादिक** ह्यांचा श्रृंगार वर्णिला असतां तेथें **शृंगाररसाभास** होतो. असेच इतर रसाभासहि अनुचितत्वामुळें होतात असें जाणावें. तात्पर्य, उचित **नायकादिक** असले म्हणजे रसपुष्टि होते, आणि तेच अनुचित असले म्हणजे अपुष्टि होऊन **रसाभास** होतो. असेंच **भावाचें**हि जाणावें.

**प्रश्न.**–आतां प्रथम **शृंगाररसाचे** भेद किती ते व त्यांचीं उदाहरणें सांगावीं.

**उत्तर.–संभोग** आणि **विप्रलंभ** असे त्यांचे दोन मुख्य भेद आहेत. **संभोगशृंगारांत नायक** व **नायिका** वियुक्त नसून त्यांचे विलास वर्णिले असतात. **विप्रलंभशृंगारांत** त्यांचा वियोग असून परस्परांस विरहामुळें मदनाची वगैरे बाधा होते ती वर्णिली असते. त्यांचीं क्रमानें उदाहरणें.

## संभोगश्रृंगार

### श्लोक नवीन

**निद्रेचें मिष घे पती तंव खरा निद्रिस्त तो मानुनी,**
**बाला सद्महि शून्य पाहुनि हळूं चुंबी तयालागुनी ॥**
**गालीं कंटक पाहतांचि पतिच्या चित्तांत ओशाळली,**
**तों हांसोनि भुजीं बळें कवळुनी त्यानेंहि ती चुंबिली ॥१॥**

कोणी एक **नायक** झोंपेचें मिष करून शयनावर निजला असतां, तो खराच झोंपीं गेला आहे असें त्याची स्त्री बाला होती तिला वाटलें; आणि घरांतहि दुसरें कोणी नाहीं असें पाहून तीं त्याचें चुंबन घेऊं लागली, तों त्याच्या गालांवर रोमांच उभे राहिले; त्यावरून तो जागाच आहे असें जाणून ती लज्जित झाली; हें जाणून नायक हांसला व तिला भुजांत बळकट आवळून धरून तिचें चुंबन करिता झाला; ह्या भावार्थाचा हा श्लोक आहे. ह्यांत मुख्य रस **संभोगशृंगार**; त्याचा **स्थायीभाव रति**; **आलंबनविभाव पति** व स्त्री; **उद्दीपनविभाव** एकांत घर; **अनुभाव** चुंबनादि व्यापार; आणि **व्यभिचारी भाव** लज्जा, हर्ष, इत्यादिक आहेत असें जाणावें.

## विप्रलंभशृंगार

### श्लोक

**उत्संगीं वससी अजूनि गिरिचे तूं कीं अये निम्नगे,**
**उत्संगीं वसणें जिला प्रिय वधू ती पाहिली सांग गे ॥**
**नेत्रें पंकजशीं कुचद्वय तसें कोकापरी शोभतें,**
**काळ्या षट्पदपंक्तिचे परि शिरीं जीच्या अहो केश ते ॥ १ ॥**

( स्वकृत जा. प. नाटक. )

**सीतेच्या** वियोगामुळें भ्रांत होऊन **रामचंद्र** वनांत फिरत असतां, एक गिरिनदी त्यानें पाहिली; त्या वेळची ही तिजप्रत त्याची उक्ति आहे. ह्या उदाहरणांत मुख्य रस **विप्रलंभशृंगार; स्थायीभाव रति; आलंबनविभाव सीता; उद्दीपनविभाव गिरिनदी,** व तद्गत कमळें, कोकपक्षी, भ्रमर इत्यादि **अनुभाव** विलाप; **व्यभिचारीभाव** स्मृति, भ्रांति, इत्यादिक आहेत असें जाणावें.

**प्रश्न.**– आतां **हास्यादि** सर्व **रसांचीं उदाहरणें** सांगावीं.

**उत्तर.**– बरें आहे, सांगतों.

## उदाहरणें

### हास्यरस श्लोक (नवीन)

**खाई माषवडे गुरू मग अपानद्वार झालें खुलें,**
**धोंधों वात निनादयुक्त निघतां भी घेति तान्हीं मुलें ॥**
**पोथ्यांचीं उडतीं दलें, लँवडती दौतीहि वाऱ्यामुळें,**
**विद्यार्थी हंसती तदा खदखदां पोटां धरोनी बळें ! ॥ १ ॥**

कोणीं एका गुरूनें उडदांचे वडे खाल्ले त्यामुळें त्याच्या अपानवायूचा फार जोर झाला, आणि मोठा शब्दयुक्त धोंधाटा चालिला. त्या धोंधाटयाच्या योगानें तान्हीं मुलें होतीं तीं डचकलीं; पोथ्यांचीं पानें उडालीं; शाईच्या दौती पालथ्या झाल्या; अशी एकच गर्दी झाली; ती पाहून विद्यार्थी मंडळी होती ती पोटें धरधरून हांसूं लागली, असा ह्या श्लोकाचा तात्पर्यार्थ आहे.

ह्यांत मुख्य **रस हास्य; स्थायीभाव हास; आलंबनविभाव** अपानवायु सोडणारा गुरु; **उद्दीपनविभाव** अपानवायु चालणें; पोथ्यांचीं पत्रें उडणें,

इत्यादि; **अनुभाव** पोट धरणें इत्यादि ; **व्यभिचारीभाव** अर्थात् चपळता इत्यादि आहेत असें जाणावें.

### श्लोक दुसरा

**नेत्रीं काजळ, टोप मस्तकिं तसे चेंडू उरीं बांधुनी,**
**भीतीनें लपती अरी तव पुरीं पण्यांगना होउनी ॥**
**वस्त्रां फेडुनि पाहती विट तयां सानंद भोगावया,**
**हाहारे फसलों अम्ही म्हणति ते कां जे न हो ह्या स्त्रिया ॥१॥**

तुझे शत्रु भयानें वेश्यांचीं सोंगें घेऊन तुझ्या नगरींत लपून राहिले, त्यांपाशीं जे कोणी जार भोगार्थ गेले ते फसले जाऊन त्यांची फजिती झाली. अशा भावार्थाची ही कोण्या एक्या कवीची राजाप्रत उक्ति आहे.

ह्या उदाहरणांत **मुख्यरस** हास्य ; **स्थायीभाव** हास; **आलंबनविभाव** स्त्रीवेषधारी पुरुष वगैरे ; **उद्दीपनविभाव** वस्त्रें फेडणें वगैरे; **अनुभाव अर्थात्** नेत्रसंकोच वगैरे; **व्यभिचारीभाव** अर्थात् चपलता इत्यादि जाणावें.

### करुणरस श्लोक

**धिक्कारूनी गोष्टि मातेस सांगे,**
**कौसल्येच्या ये गृहा सानुरागें ॥**
**त्यातें देखे जेधवां राममाय,**
**श्रीरामाचा शोक लोकीं न माय ॥ १ ॥**
**मोकळा करुनि कंठ तेधवां,**
**आठवूनि मनिं जानकीधवा ॥**
**ते रडे भरतही तसा रडे,**
**जोंवरी नयन होति कोरडे ॥ २ ॥**

**रामचंद्र** वनांत गेल्यावर भरत हा मामाच्या घरीं होता, तो तेथून येऊन पहिल्यानेंच आपली आई जी **कैकेयी** तिची बहुत प्रकारें निर्भर्त्सना करून तेथून **कौसल्ये**च्या गृहाप्रत आला, त्या समयीं उभयतांसहि जो शोकाचा अत्यंत वेग आला त्याचें हें **वामनपंडितानें** वर्णन केलें आहे.

ह्यांत **मुख्य रस करुण; स्थायीभाव शोक; आलंबनविभाव रामचंद्र; उद्दीपनविभाव** त्याचें वनांत जाणें; **अनुभाव** रुदन, **व्यभिचारीभाव** स्मरण इत्यादि आहेत असें जाणावें.

## आणखी श्लोक

**पाळावी क्षिति आजपासुनि तुह्मीं न्यायें मनूच्यापरी,**
**माझ्या ह्या जननी बुडोत न महाशोकार्णवाभीतरीं ॥**
**योजा तुम्हि असें सुदिव्य पदही आम्हा कृपेनें मिळे,**
**शत्रुघ्नासह अग्निकाष्ठ गिळितों मी रामशोकामुळें ॥ १ ॥**

(स्वकृत जा. प. नाटक.)

**रामचंद्र** मारला गेल्याचें खोटें वर्तमान ऐकल्यामुळें **भरत** हा शोकानें व्याकुळ होऊन **वसिष्ठादिकांस** निरवणुकीचा निरोप पाठविता झाला, तेव्हांची ही त्याची उक्ति आहे.

हींत **मुख्यरस करुण**; **स्थायीभाव शोक**; **आलंबनविभाव रामचंद्र**; **उद्दीपनविभाव रामचंद्राच्या** मरणाचें वर्तमान; **अनुभाव** गद्गद भाषण; **व्यभिचारीभाव** अर्थात् स्मृति, विषाद इत्यादि आहेत असें जाणावें.

## रौद्ररस श्लोक

**ज्या ज्या शस्त्रधरीं तुम्हीं नृपशुनीं दुष्कर्म आरंभिलें,**
**केलें वा अनुमोदिलें दुरुनियां दोषास वा पाहिलें ॥**
**त्यांचीं भीम किरीटि कृष्ण सकटां काढोनि मांसें पहा,**
**देतों मी सकळां दिशांस बळि हें मत्कर्म आतां सहा ॥ १ ॥**

परशुरामपंत गोडबोलेकृत वे. सं. नाटक.

आपला पिता **द्रोणाचार्य** हा समाधि लावून बसला असतां **धृष्टद्युम्नानें** येऊन अन्यायानें त्याचें मस्तक तोडिलें, हें वर्तमान ऐकून **अश्वत्थामा** परम कोपायमान झाला, त्या वेळची ही त्याची उक्ति आहे.

हींत **मुख्यरस रौद्र**; **स्थायीभाव क्रोध**; **आलंबनविभाव** अर्थात् **धृष्टद्युम्नादि पांडवपक्षाचे** वीर; **उद्दीपनविभाव** मस्तकच्छेदादि कर्म; **अनुभाव** संतापानें बोलणें; **व्यभिचारीभाव** अर्थात् **गर्व** इत्यादि आहेत असें जाणावें.

## आणखी श्लोक (वामनी)

**गांगेय कोपा चढला कसा रे,**
**ज्या मानिती हाचि कृतांत सारे ॥**
**गर्जोनियां सिंहरवें जयातें,**
**पाहे जणों मारिल आज यातें ॥ १ ॥**

त्वां काय कर्म करिजे लघु लेंकरानें,
बोलोनियां मग धनू धरिलें करानें ॥
तें व्यापिलें सकल सैन्य महाशरांनीं,
भीष्में जसा पतित होय हुताश रानीं ॥ २ ॥

**अर्जुनाची** वल्गना ऐकिल्यावर **भीष्म** हा परम कोपायमान होत्साता मोठें घोर युद्ध करिता झाला, त्या वेळचें हें त्याचें वर्णन आहे.

ह्यांत **मुख्यरस रौद्र; स्थायीभाव** क्रोध; **आलंबनविभाव अर्जुन; उद्दीपनविभाव** त्याची गर्वोक्ति; **अनुभाव** धनुष्य धारण करणें, बाण सोडणें इत्यादि; **व्यभिचारीभाव** अर्थात् उग्रता, आवेग इत्यादि आहेत असें जाणावें.

## वीररस

### श्लोक (वामनी)

पितामह वदे तदा प्रबल तूं पृथानंदना,
रमेश रथि सारथी चतुर वागवी स्यंदना ॥
स्वयें गतवयस्क मी चतुर वीर तूं रे नवा,
भिडें रणधुरंधरा जय घडो सुखें वा नवा ॥ १ ॥

**श्रीकृष्णाच्या** हातून शस्त्र धरविण्याची **भीष्मानें** प्रतिज्ञा केली त्या प्रसंगीं ही त्याची **अर्जुनाप्रत** उक्ति आहे.

हींत **मुख्यरस वीर; स्थायीभाव** उत्साह (आवेश); **आलंबनविभाव अर्जुन; उद्दीपनविभाव** पूर्वींची **अर्जुनाची** वल्गना; **अनुभाव** अर्थात् धनुष्य हातीं घेणें, बाण सोडणें वगैरे युद्धोयोग; **व्यभिचारीभाव** अर्थात् धैर्य, गर्व इत्यादि आहेत असें जाणावें.*

### आणखी श्लोक (वामनी)

गर्वोक्ति फाल्गुन वदे जगदेकराया,
आहे असा कवण तो झगडा कराया ॥
म्यां कालखंज वधिले अतुलप्रतापी,
पौलोमहि असुर गोसुरविप्रतापी ॥ १॥

**भीष्माबरोबर अर्जुनाचें** युद्ध चालू झालें असतां, ही **श्रीकृष्णाप्रत अर्जुनाची** गर्वोक्ति आहे.

* दानवीर, दयावीर, धर्मवीर इत्यादिक ह्या वीररसाचे अनेक भेद आहेत. वरील उदाहरण युद्धवीराचें आहे.

हींत **मुख्यरस** **वीर;** **स्थायीभाव** **उत्साह;** **आलंबनविभाव** **भीष्म;** **उद्दीपनविभाव** शत्रूचा युद्धप्रसंग; **अनुभाव** अहंकारयुक्त भाषण; **व्यभिचारीभाव** गर्व इत्यादि आहेत असें जाणावें.

### भयानकरस श्लोक

**गुणातें आकर्षी जंव रघुकिशोर प्रबल हा,**
**धनू झालें भग्न स्वप्न निपजला दारुण महा ॥**
**वधू तैं रक्षाया अज नुघडि आस्यें क्षण निजे,**
**तसा शंभू डावें वपु कवळि सव्येतर भुजें**

स्वकृत जानकीपरिणय नाटक.

**सीतास्वयंवरप्रसंगीं रामचंद्रानें** शिवधनुष्याचा भंग केला, तेव्हां मोठा भयंकर शब्द होऊन ब्रम्हादिकांसहि आपल्या स्त्रिया घाबरतील अशी भीति उत्पन्न झाली ह्या अर्थाविषयीं हा श्लोक आहे.

ह्यांत **मुख्यरस भयानक; स्थयीभाव भय; आलंबनविभाव रामचंद्र; उद्दीपनविभाव** धनुर्भंगाचा शब्द; **अनुभाव** तोंड मिटून धरणें, डावें आंग उजव्या हातानें आंवळून धरणें; **व्यभिचारीभाव** अर्थात् आवेग, चांचल्य इत्यादि आहेत असें जाणावें.

### आणखी श्लोक (नवीन)

**उद्यद्रोषकषायिताक्षिदहनज्वालाकरालाननीं,‡**
**दंष्ट्रा चावुनियां करी नरहरी चंडाट्टहासध्वनी* ॥**
**तो ऐकोनि समस्त दानवकुलें भेणें पळों लागलीं,**
**मार्गीं आडखळोनि जें पडति तें मूर्च्छा तयांना अली ॥१॥**

**विष्णूनें नरसिंहावतार** घेऊन **हिरण्यकशिपूचा** वध केला, त्या समयीं तें त्याचें अत्यंत उग्र रूप पाहून आणि त्यानें जो भयंकर शब्द केला तो ऐकून दैत्यांचे समुदाय भयानें व्याकुळ झाले आणि घाबऱ्यां घाबऱ्यां चोहींकडे पळूं लागले, त्या वेळचें हें वर्णन आहे.

---

‡ अत्यंत प्रदीप्त होणाऱ्या क्रोधामुळें आरक्त झालेले जे नेत्र तत्संबंधीं जो अग्नि त्याच्या ज्वालेंकरून भयंकर दिसणारें जें मुख त्याच्याठायीं (दाढा चावुनि नरहरी ध्वनी करी असा अन्वय). * भयंकर हास्यपूर्वक शब्द.

ह्यांत **मुख्यरस भयानक; स्थायीभाव भय; आलंबनविभाव नरसिंह; उद्दीपनविभाव** त्याचें दाढा चावणें, गुरगुरणें इत्यादि; **अनुभाव** पळणें इत्यादि; **व्यभिचारीभाव** मूर्च्छा इत्यादि आहेत असें जाणावें.

**बीभत्सरस श्लोक (नवीन)**

**जेव्हां फार पशू कुजून पडती होती तयांना किडे,**
**तेव्हां ओढुनि कातडें चघळिती कुत्रीं तयांचीं हडें ॥**
**आळ्या वेंचुनि कावळे गिळिति त्या घाणीस जे पाहती,**
**कांटा येउनि देहिं त्या मग कशी वांती न होईल ती ॥ १ ॥**

गुरें सडून त्यांना किडे पडतात, त्यांस कुतरीं, कावळे खातात, त्यांतें जे पाहातात त्यांच्या आंगास कांटा येऊन ओकारी येते. ह्या घाणेरड्या अर्थाचा हा श्लोक आहे.

ह्यांत **मुख्यरस बीभत्स; स्थायीभाव जुगुप्सा** ( कंटाळा–किळस ); **आलंबनविभाव** कुजलेले पशु; **उद्दीपनविभाव** आळ्या; किडे; **अनुभाव** ओकणें; **व्यभिचारीभाव** अर्थात् आवेग इत्यादि आहेत असें जाणावें.

**आणखी अभंग (नवीन)**

**नाक शेंबूडाचें घर, मुखीं लाळेचे पाझर ॥**
**रक्तमास वसा हाडें, आंत बाहेरी कातडें, ॥ १ ॥**
**मळमूत्र खत पोटीं, ज्यास घाण चाले मोठी, ॥**
**त्यांत जंत आणि किडे, वपु ऐसें घाणरडें ॥ २ ॥**
**साधु पाहोनी थुंकती, आंगि त्यांच्या कांटे येती ॥**
**भावें प्रार्थिती देवास, पुन्हां नको हें आम्हांस ॥ ३ ॥**

देहाच्या घाणेरडेपणामुळें **साधुपुरुषांस** त्याची किळस येऊन हा देह पुन्हां आम्हांस देऊं नको म्हणून ते **ईश्वरापाशीं** प्रार्थना करितात, ह्या अर्थाचे हे अभंग आहेत.

ह्यांत **मुख्यरस‡ बीभत्स; स्थायीभाव जुगुप्सा** (कंटाळा, चिळस ;)

‡ ह्या अभंगांत शेवटीं देहाविषयीं वैराग्य होऊन साधुपुरुष तो नको म्हणून ईश्वरापाशीं प्रार्थना करितात. हा शांतरस आणिला आहे; तेव्हां देहाच्या घाणेरडेपणाचें जें पूर्वीं वर्णन केलें, तो बीभत्सरस त्या-शांतरसाचे अंगत्वेंकरून पोषक झाला. तो विस्तारानें वर्णिला आहे, म्हणून त्याला मुख्य म्हटलें.

**आलंबनविभाव** रक्त, मास, हाडें, इत्यादि ; **उद्दीपनविभाव** मळ, मूत्र, जंत इत्यादि ; **अनुभाव** थुंकणें ; **व्यभिचारीभाव** अर्थात् मोह इत्यादि आहेत असें जाणावें.

## अद्भूत श्लोक (वामनी)

**छावा उठे दशरथप्रभु दिग्गजाचा,**
**घे चाप इक्षुसम तें पति भर्ग ज्याचा ॥**
**शुंडास्वबाहु उचलोनिच चालिला हो**
**घेती समस्त नयनीं प्रभुचाचि लाहो ॥ १ ॥**

अत्यंत सुकुमार राजकुमार **रामचंद्र** ह्यानें तें परम विशाल **शिवधनुष्य** लीलामात्रेंकरून उचलिलें त्या वेळचें हें वर्णन आहे.

ह्यांत **मुख्यरस अद्भूत; स्थायीभाव विस्मय; आलंबनविभाव रामचंद्र; उद्दीपनविभाव** चापग्रहण; **अनुभाव** अर्थात् साश्चर्यविलोकन; **व्यभिचारीभाव** अर्थात् वितर्क, आवेग, हर्ष, इत्यादि आहेत असें जाणावें.

## आणखी श्लोक (वामनी)

**जे जळांत बुडणार तीव्र ते, थोर पर्वत अवो पतिव्रते ॥**
**सागरीं तरति सेतुवाट ते, हे अतर्क्यकरणीच वाटते ॥ १ ॥**
**परततां जळधीवरि पाहते, तरति पर्वत विस्मित पाहते ॥**
**जळतळीं वरि हो धरणीसये, कधि नसे तुलना करणीस ये ॥ २ ॥**

**रावणाचा** वध करून **सीतेसहवर्तमान रामचंद्र अयोध्येप्रत** परत येत असतां मार्गी **अगस्ति** मुनीच्या आश्रमांत गेले; तेथें मुनिपत्नी **लोपामुद्रा** हिचा आणि **सीतेचा** संवाद झाला, त्या प्रसंगीं **रामचंद्रानें** पाण्यावर शिळा तारून समुद्रांत सेतु बांधिल्याचें लोकोत्तर व अद्भुत असें कृत्य केलें, हें वर्तमान सीतेनें सांगितलें त्या वर्णनाचे हे श्लोक आहेत.

ह्यांत **मुख्यरस अद्भुत; स्थायीभाव विस्मय; आलंबनविभाव रामचंद्र; उद्दीपनविभाव** पाण्यावर पाषाण तरणें, **अनुभाव** अर्थात् आश्चर्यसूचक मुद्रा करून बोलणें; **व्यभिचारीभाव** अर्थात् स्मृति, हर्ष, इत्यादि आहेत असें जाणावें.

## शांतरस श्लोक (नवीन)

कधीं काशीमध्यें बसुनि शुभ भागीरथीवरीं,
धरोनी कौपीना कटितटिं तसा अंजलि शिरीं ॥
"अये गौरीनाथ त्रिपुरहर शंभो त्रिनयन,
प्रसीदत्वं" ऐसें म्हणत पळवत् काढिन दिन ॥ १ ॥

कौपीन परिधान करून काशीमध्यें भागीरथीच्या तीरीं बसून श्रीशिवस्मरण करीत होत्साता मी पळाप्रमाणें दिवस कधीं काढीन बरें! अशा भावार्थाची ही कोणी एक्या संसाराविषयीं उपरति झालेल्या पुरुषाची उक्ति आहे.

हींत **मुख्यरस शांत; स्थायीभाव शम; आलंबनविभाव** अर्थात् संसाराची निःसारता; **उद्दीपनविभाव** काशी, भागीरथी इत्यादि; **अनुभाव** अर्थात् रोमांच इत्यादि; **व्यभिचारीभाव** अर्थात् चिंता इत्यादि आहेत असें जाणावें.

## आणखी श्लोक (नवीन)

असारीं संसारीं सकलहि विनाशी दिसतसे,
म्हणोनी जो सारा हरिपदसरोजा भजतसे ॥
विरक्ती ज्यालागीं वरुनि जणुं सेवी पतिपरी,
तयाला त्रैलोक्यप्रभुपद नको प्राप्तहि जरी ॥१॥

संसार निःसार आहे असें जाणून जो कोणी पुरुष सारभूत जे हरिचरणकमल त्याला भजतो त्यास वैराग्य हें स्वयमेव प्राप्त होऊन, त्रैलोक्याचें राज्यहि मिळूं लागलें तरी तें नकोसें होतें, असा ह्या श्लोकाचा भावार्थ आहे.

एथें **मुख्यरस शांत; स्थायीभाव शम; आलंबनविभाव** संसाराची निःसारता, परमार्थ स्वरूप इत्यादि; **उद्दीपनविभाव** अर्थात् पुण्यक्षेत्र, सज्जन समागम इत्यादि, **अनुभाव** अर्थात् रोमांच इत्यादि, **व्यभिचारीभाव** हर्ष इत्यादि आहेत असें जाणावें.

## वत्सलरस श्लोक

रडे फुंदफुंदे शिरीं पादपद्मा,
धरी सद्म मानीतसे नित्य पद्मा ॥
बळें क्षेम घे त्यास ओढूनि राम
स्वभक्तप्रियस्वामिभक्ताभिराम ॥ १ ॥

**मांडियेउपरि बैसविला हो,**
**अश्रुनीर पुसि हें सुख ला हो ॥**
**वांसरा न रड सांग सुवार्ता,**
**शब्द हा निववि दुःखदवार्ता ॥ २ ॥**

**रामचंद्र** वनवासास गेल्यावर त्याला परत आणायाकरितां **भरत** हा वनांत गेला तेव्हां दर्शनसमकाल उभयतांस अत्यंत प्रेमभाव उत्पन्न झाला; **भरतानें** फुंदत फुंदत **रामचंद्राचे** पाय गच्च धरिले, **रामचंद्रानें** त्याला मोठ्या बलात्कारानें उठवून आलिंगन देऊन आपल्या मांडीवर बसविलें आणि 'वत्सा, रडूं नको बरें' असें म्हणून अत्यंत स्नेहानें त्याचे डोळे पुसले; त्या वेळचें हें वर्णन **वामन** पंडितानें केलें आहे,

ह्यांत **मुख्यरस वत्सल; स्थायीभाव स्नेह; आलंबनविभाव भरत; उद्दीपनविभाव भरताचे** रडणें इत्यादि; **अनुभाव रामचंद्रानें** त्यास आलिंगन देऊन मांडीवर बसविणें इत्यादि; **व्यभिचारीभाव** अर्थात् **रामचंद्रनिष्ठ** अनिष्टशंका, आवेग इत्यादि आहेत असें जाणावें.

## आणखी लोक ( मोरोपंत )

**वैदर्भी यास पाहे द्रव हृदय धरी तत्क्षणीं स्तन्य वाहे,**
**कीं ते आनंद लाहे जरि तनुज असें ज्ञात होणेंचि आहे ॥**
**बाष्पानें कंठ दाटे सकळ तनुवरी क्षिप्र रोमांच थाटे,**
**शोकाचा सिंधु आटे त्वरित परम तद्दर्शनीं लोभ वाटे ॥ १ ॥**

**रुक्मिणीचा** पुत्र **प्रद्युम्न** ह्याला तान्हेपणींच **शंबरासुरानें** उचलून नेलें. कांहीं वर्षें लोटल्यावर तो मोठा होऊन **द्वारकेस** परत आला; त्यास पाहून **रुक्मिणीचें** हृदय पुत्रस्नेहानें परिपूर्ण झालें; त्या वेळचें हें तिचें वर्णन मोरोपंतानें केलें आहे,

ह्यांत **मुख्यरस वत्सल; स्थायीभाव स्नेह; आलंबनविभाव प्रद्युम्न उद्दीपनविभाव** त्याचें दर्शन; **अनुभाव** स्नेहपूर्वक पाहाणें इत्यादि; **व्यभिचारी भाव** आनंदाश्रु; पान्हा फुटणें इत्यादि आहेत असें जाणावें.

## रत्यादिक जे स्थायीभाव त्यांचीं लक्षणें

१. **रति.**—संभोगविषयक जो इच्छाविशेष ती.
२. **हास.**—विकृतवेषादिकांच्या दर्शनेंकरून होतो जो मनोविकार तो.

३. **शोक.**—इष्टनाश व अनिष्टप्राप्ति ह्यामुळें होतो जो चित्तवृत्तिविशेष तो.

४. **क्रोध.**—शत्रु इत्यादिकांनीं केलेल्या अपकारापासून होतें जें मनाचें प्रज्वलन तो.

५. **उत्साह.**—लोकोत्तर कार्याविषयीं होते जी उत्सुकता तो.

६. **भय.**—रौद्रदर्शनादिकेंकरून होते जी अनर्थशंका तें.

७. **जुगुप्सा.**—अर्थाच्या दोषदर्शनानें होते जी गर्हणा ती.

८. **विस्मय.**—अपूर्वार्थदर्शनेंकरून होतो जो चित्ताचा विस्तार तो.

९. **शम.**—वैराग्यादिकेंकरून होते जी चित्ताची निर्विकारता तो.

---

## स्तंभादिक सात्विकभावांचीं लक्षणें

१. **स्तंभ.**—अनुराग, भीति इत्यादिकांमुळें होतें जें अंगाचें क्रियाशून्यत्व तो.

२. **प्रलय.**—सुखदु:खादिकामुळें होतें जें इंद्रियांचें गाढ मूर्छन तो.

३. **रोमांच.**—सुखादिकांच्या अतिशयामुळें शरीरावर येतो जो कांटा तो.

४. **वेपथु.**—अनुराग, द्वेष, भीति इत्यादिकांमुळें होतो जो अंगाचा कंप तो.

५. **स्वेद.**—रति, उष्मा, श्रम इत्यादिकांपासून निघतें जें अंगांतून पाणी तो.

६. **वैवर्ण्या.**—विषाद, मद, रोष इत्यादिकांमुळें मुखादिकांचा फिरतो जो वर्ण तें.

७. **अश्रु.**—दु:ख, रोष, प्रहर्ष ह्यांच्यायोगें येतें जें नेत्रांस पाणी तें.

८. **वैस्वर्य.**—हर्षादिकांच्या योगानें होतें जें कंठाचें सद्‌गदितत्व तें.

---

## निर्वेद इत्यादिक जे ३३ व्यभिचारी अथवा संचारीभाव आहेत म्हणून पूर्वी सांगितलें त्यांचीं नांवें व लक्षणें खालीं सांगतों :

१. **निर्वेद.**—दु:ख, ईर्ष्या, तत्त्वज्ञान, इत्यादिकांच्या योगानें होते जी निष्फलत्व बुद्धि तो; ह्यांत चिंता, अश्रु, निश्वास, दैन्य हीं होतात.

२. **ग्लानि.**—बलाची जी क्षीणता ती. हिजपासून वैवर्ण्य, अरति हीं होतात.

३. **शंका.**—अनिष्ट प्राप्त होईल काय अशी उत्प्रेक्षा. हिजपासून रोषादिक होतात.

४. **असूया.**—परोत्कर्षाचें असहिष्णुत्व.

५. **मद**—मद्यादिकांच्या योगानें मोह, हर्ष इत्यादिक करणारा जो मनोविकार तो.

६. **श्रम.**—रति, मार्गक्रमण, इत्यादिकांपासून होतो जो शीण तो. यापासून स्वेदादिक होतात.
७. **आलस्य.**—कर्तव्याविषयीं होतें जें उद्योगाचें मंदत्व तें.
८. **दैन्य.**—सत्वनाशामुळें कार्पण्य येऊन होतें जें अनुद्धतत्व तें.
९. **चिंता.**—इष्टाच्या अप्राप्तीमुळें शून्यत्व व ताप करणारें जें ध्यान ती.
१०. **मोह.**—भय, दुःख, आवेश, चिंतन, यांच्यायोगें येते जी मूर्च्छा तो.
११. **स्मृति.**—पूर्वानुभूत विषयांचें ज्ञान ती.
१२. **धृति.**—इष्टप्राप्ति इत्यादिकेंकरून होते जी चित्ताची निस्पृहता ती.
१३. **व्रीडा.**—काम, स्तुति, इत्यादिकांमुळें होतो जो चित्तसंकोच ती.
१४. **चपलता.**—रागद्वेषादिकामुळें होतें जें चित्ताचें अनवस्थान ती.
१५. **हर्ष.**—उत्सवादिकामुळें होतो जो चित्तप्रसाद तो. यापासून स्वेद, अश्रु, कंप, हे होतात.
१६. **आवेग.**—इष्टानिष्टाच्या योगानें होतो जो चित्तसंभ्रम तो.
१७. **जडता.**—इष्टानिष्टप्राप्तीपासून येतें जें जाड्य ती.
१८. **गर्व.**—बलात्कारादिकापासून परधिक्कारानें होतो जो आत्मोत्कर्ष तो.
१९. **विषाद.**—उपायापायचिंतनानें होतो जो मनोभंग तो.
२०. **औत्सुक्य.**—मनस्ताप, त्वरा, इत्यादि करणारें जें कालाक्षमत्व तें.
२१. **निद्रा.**—चित्ताचें निमीलन ती.
२२. **अपस्मार.**—दुःखमोहादिकेंकरून अंगताप करणारा होतो जो आवेश तो.
२३. **सुप्ति, स्वप्न.**—निद्रेचा अतिरेक.
२४. **विबोध.**—जृंभा, नेत्रोद्घाटन यांतें करणारी जी चेतनाप्राप्ति तो.
२५. **अमर्ष.**—अपराध्याविषयीं जें चित्ताचें प्रज्वलन तो.
२६. **अवहित्थ्या.**—हर्षादिक आकाराचें गोपन ती.
२७. **उग्रता.**—तर्जनादि करणारें अपराध्याविषयीं जें चंड दंडत्व ती.
२८. **मति.**—तत्त्वमार्गानुसंधानानें होतें जें अर्थनिर्धारण ती.
२९. **व्याधि.**—मनस्तापादि अभिभव व तज्जन्य ज्वरादिक तो.
३०. **उन्माद.**—चेतनाऽचेतनादिविषयीं जें तुल्यवृत्तित्व तो.
३१. **मरण.**—मरणार्थ जो प्रयत्न तें.
३२. **त्रास.**—आकस्मिक भावानें होतो जो चित्तविक्षेप तो.
३३. **बितर्क.**—संशयास्तव अन्य कल्पना करणें तो.

---

## रसाच्या विरोधाचें कोष्टक

| रस | विरुद्ध रस. | कोणता रस उ० होतो ? |
|---|---|---|
| शृंगार | करुण, बीभत्स, रौद्र, वीर, भयानक. | हास्य |
| हास्य | भयानक, करुण. | |
| करुण | हास्य, शृंगार. | |
| रौद्र | हास्य, शृंगार, भयानक, अद्‌भुत. | करुण |
| वीर | भयानक, शांत. | अद्‌भुत |
| भयानक | शृंगार, वीर, रौद्र, हास्य, शांत. | |
| बीभत्स | शृंगार. | भयानक |
| अद्‌भुत | रौद्र. | |
| शांत | वीर, शृंगार, रौद्र, हास्य, भयानक. | |



शृंगार बीभत्स, वीर भयानक, रौद्र अद्‌भुत, हास्य करुण, हें रस परस्परें वैरी म्हणजे विरुद्ध आहेत, असेंहि शृंगारतिलकांत सांगितलें आहे.

## रसाच्या अनुकूळ व प्रतिकळ वृत्तांचें कोष्टक :

| रस | अनुकूळ वृत्तें | प्रतिकूळ वृत्तें |
|---|---|---|
| श्रृंगार | शार्दूलविक्रीडित, वसंततिलका, पृथ्वी, हरिणी, शिखरिणी, मंदाक्रांता, मालिनी, स्रग्धरा, इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, रथोद्धता, द्रुतविलंबित, इत्या० | पथ्या इत्यादिक. |
| हास्य | दोधक, तोटक, भुजंगप्रयात इत्यादिक जीं प्रतिपदीं विच्छेद पावणारीं तीं. | पृथ्वी इत्यादिक. |
| करुण | मंदाक्रांता, पुष्पिताग्रा, मालिनी, द्रुतविलंबित, इत्यादिक. | दोधक इत्यादिक. |
| रौद्र | हरिणी, शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा, रथोद्धता, अनुष्टुप् इत्यादिक. | शिखरिणी इत्यादिक. |
| वीर | इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, वंशस्थ, शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, स्रग्धरा इ० | प्रहर्षिणी, मालिनी, इत्यादिक. |
| भयानक | स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, शाक्वर, पथ्या, इत्यादिक. | |
| बीभत्स | शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा, वंशस्थ, रथोद्धता, इत्यादिक. | मंदाक्रांता इत्यादिक. |
| अद्भुत | शार्दूलविक्रीडित, नंदिनी, कुसुमविचित्रा, शालिनी, स्वागता, उपचित्र, वसंततिलका, इंद्रवज्रा, इत्यादिक. | शिखरिणी इत्यादिक. |
| शांत | शिखरिणी, मंदाक्रांता, शार्दूलविक्रीडित, इत्यादिक. | कुसुमविचित्रा इत्यादिक. |

# प्रकरण पांचवें

## गुण

**प्रश्न.**–काव्याच्याठायीं **गुण** ते कसे व ते किती आहेत?

**उत्तर.**–मनुष्याच्याठायीं जसे **शौर्यादिक** गुण तसे काव्याच्याठायीं **माधुर्यादि** गुण आहेत, ते वस्तुत: रसाचेच धर्म होत; परंतु काव्य हें रसाचा देह होय म्हणून त्यांस काव्याचे गुण असें म्हणतात. ते मुख्यत्वें तीन आहेत; **माधुर्य, ओज** आणि **प्रसाद.**

**प्रश्न.–माधुर्य** गुण कोणता?

**उत्तर.**–जेणेंकरून अंत:करण द्रवीभूत होतें, तें माधुर्य होय. हें माधुर्य **संभोगश्रृंगार, करुण, विप्रलंभश्रृंगार** आणि **शांत,** ह्या रसांत क्रमेंकरून अधिकाधिक असतें. याचीं अनुक्रमानें उदाहरणें, अनुष्टुप्‌छंदानें सांगतों.

**संभोगश्रृंगार**

**आलिंगनें अंगनाचे, कांता संतोष होतसे ॥**
**मंजीरांचें[1] शिंजितही[2], कानां आनंद देतसे ॥ १ ॥**

**करुणरस**

**इंदुकुंदमिलिंदांचीं[3], वृंदें[4] इंदीवरें[5] तसीं ॥**
**मंद जीतें विलोकूनी, गेली ती मत्प्रिया कसी ॥ १ ॥**

**विप्रलंभश्रृंगार**

**अनंगें[6] तापलीं अंगें, त्यांना कोमल पल्लवीं ॥**
**गुंडाळुनी विरहिणी, वसंतीं काल घालवी ॥ १ ॥**

**शांतरस**

**कांतांतें कांचनातेंही, निंदिती संत संतत ॥**
**अनंतीं सच्चिदानंदीं, जे प्रमोदें सदा रत ॥ १ ॥**

**प्रश्न.–ओज** गुण कोणता?

**उत्तर.**–अंत:करणाचें दीपन करणारा जो गुण तें **ओज** होय. हा गुण **वीर,**

---

१. पादभूषणांचें. २. शब्द. ३. चंद्रकुंदपुष्पें व भ्रमर यांचे. ४. समुदाय. ५. कमलें. ६. मदनानें.

**बीभत्स**, आणि **रौद्र** ह्या रसांत क्रमानें अधिकाधिक असतो. अनुक्रमेंकरून उदाहरणें अनुष्टुप्श्लोकांनीं सांगतों.

**वीररस**

**जानें त्रिनेत्रदोर्दंडमंडि[1] कोदंड खंडिलें ॥**
**दशवक्त्रक्षयासाठीं[2], त्यानें अस्त्रांस घेतलें ॥ १ ॥**

**बीभत्सरस**

**प्रेतें नाचति मस्तिष्कमेदःस्नाय्वंत्रतृप्तिनें[3] ॥**
**श्मशानीं जर्जरीं[4] मांसभुक्क्रोष्टुक्रूरगरजनें[5] ॥ १ ॥**

**रौद्ररस**

**नखवज्राग्रविछिन्नदैत्यवक्षा[6] नृसिंह हा ॥**
**ज्वलत्कल्पाग्निवन्नेत्रयुक्तवक्त्र[7] दिसे पहा ॥ १ ॥**

**प्रश्न**–प्रसाद गुण कोणता ? 332346

**उत्तर**–जो तत्काळ चित्ताला व्यापून टाकितो, व ज्यांतील शब्दाचा श्रवण-समकालींच अर्थबोध होतो तो **प्रसाद** होय. हा गुण सर्वरससाधारण आहे.

**उदाहरण-श्लोक वामनी**

**गोगोपिकास्तनरसें हरि तृप्त जाला,**
**त्याचेंच भाग्य कमलासन बोलियेला ॥**
**आतां व्रजीं वसति त्या सकळा जनांचे,**
**वर्णूनि भाग्यसमुदाय विरंचि नाचे ॥ १ ॥**
**अहो धन्य गौळी अहो धन्य नंद,**
**व्रजीं सर्वही धन्य हा प्राणिवृन्द ॥**
**अहो भाग्य यांचें अहो भाग्य यांचें !**
**सखेंसोयरें ब्रह्मकृष्णाख्यजांचें ॥ २ ॥**

---

१. शिवभुजातें शोभविणारें चाप. २. रावणवधार्थ. ३. मांस, मेद, स्नायु, आंतडीं यांच्या योगानें जी तृप्ति तिणेंकरून ( प्रेतें नाचती ). ४. ( जर्जरीं ) व्याप्त झालेलें ( हें श्मशानाचें विशेषण ). ५. मांसभक्षक जीं कोल्हीं त्यांच्या क्रूर गर्जनेच्या योगानें. ६. नखरूप वज्रांच्या अग्रांनीं दैत्याचें वक्षःस्थळ ज्यानें विदारिलें असा (नृसिंह.) ७. देदीप्यमान कल्पांतकालीन अग्निवत् नेत्रांनीं युक्त ज्याचें वदन असा ( नृसिंह ).

**व्रजजन बहुभाग्यें वर्णितां याप्रकारें,**
**न कळति विधिलाही जीं अतर्क्यें अपारें ॥**
**म्हणुनि विभवलेशें त्यांचिया भाग्य जेंजें,**
**अनुभविति असे ते वर्णिता देवराजें ॥ ३ ॥**

**प्रश्न.–माधुर्यादिक** जे गुण सांगितले त्यांचीं व्यंजकें काय आहेत ?

**उत्तर.–रीति** आणि **वृत्ति** ह्या त्यांच्या व्यंजक आहेत.

**प्रश्न.–रीति** म्हणजे काय व तिचे प्रकार किती तें लक्षणसहित सांगावें.

**उत्तर.**–रसाला अनुकूळ जी पदांची रचना तीस **रीति** म्हणतात, ती तीन प्रकारची आहे; **वैदर्भी, गौडी** आणि **पांचाली;** त्यांचीं लक्षणें अशीं,–

१. जींत समास अगदीं असत नाहीं; असला तर अल्प असतो ही **वैदर्भी** रीति होय. ही **रीति माधुर्याची** व्यंजक आहे.

२. जींत चार पदांपेक्षां अधिक पदांचा समास[1] असतो ती **गौडी** रीति होय, हीच **ओज गुणाची** व्यंजक आहे.

३. चार पदांच्या आंत जींत समासघटक पदें असतात, ती **पांचाली** रीति होय. ही **प्रसाद गुणाची** व्यंजक आहे.

**प्रश्न.–वृत्ति** म्हणजे काय व ती किती प्रकारची आहे ?

**उत्तर.**–रसाला अनुकूळ जी वर्णरचना तिला **वृत्ति** म्हणतात. ती **मधुरा, परुषा** व **प्रौढा** अशी तीन प्रकारची आहे. ह्यांसच **कैशिकी, आरभटी** आणि **सात्वती** अशा अनुक्रमानें संज्ञा आहेत. ह्याच[2] तीन **वृत्ति** क्रमानें **माधुर्य, ओज** आणि **प्रसाद**, ह्या गुणांच्या व्यंजक आहेत.

**प्रश्न.–माधुर्य** गुणाची व्यंजक जी **मधुरा** अथवा **कैशिकी** वृत्ति ती कोणती?

**उत्तर.**–ज्या रचनेंत अनुस्वार बहुत येतात, व 'ट ठ ड ढ' हे खेरीज करून

---

१. हा दीर्घ व लांब लांब समासघटित पदाचा प्रकार संस्कृत भाषेंत येतो म्हणून ही गोष्ट संस्कृतांतील तसल्या समासघटित दीर्घ पदासच लागू पडते. मोरोपंतासारिख्या कवीच्या प्राकृत कवितेंतहि असलीं दीर्घ समासघटित पदें आढळतात, म्हणून हा प्रकार एथें सांगितला आहे.

२. कैशिकी, आरभटी, सात्वती, आणि भारती, अशा चार वृत्ति कोमल परुषादि संदर्भपरत्वें होतात, असें कोणी ग्रंथकारांनीं सांगितलें आहे.

**स्पर्श** म्हणजे क पासून म पर्यंत सर्व वर्ण, ऱ्हस्व असे **रेफ व णकार,** व द्वित्वविशिष्ट ल म्हणजे 'ल्ल' व 'य व र ल' या प्रकारचे कोमल वर्ण जींत असतात, ती वृत्ति **मधुरा** किंवा **कैशिकी** होय.

### उदाहरण-श्लोक वामनी

**श्रृंगारश्रृंगउदयाचळ रामचंद्रा,**
**श्रीरंगतुंगहृदया रघुरामचंद्रा ॥**
**अंगांगसुंदरवरा नवमेघरंगा,**
**रंगांगणीं जनकजा जडि अंतरंगा ॥ १ ॥**

**श्रृंगार श्रृंगालय केसरी हो**
**सांगा अनंगा नटकेसरी हो ॥**
**कासे विकासे पट केसरी हो,**
**श्री शंकली पंकजकेसरी हो ॥ २ ॥**

**अनंगरंगांबुधिच्या तरंगीं,**
**रंगी शुभांगी जडि अंतरंगीं ॥**
**भंगील हा हो धनुकेवि रंगीं,**
**म्हणे कुरंगीनयनी सुरंगी ॥ ३ ॥**

**प्रश्न.–ओज** गुणाची व्यंजक जी **परुषा** किंवा **आरभटी** वृत्ति ती कोणती?

**उत्तर.**–विसर्गयुक्त, संयोग म्हणजे जोडाक्षर पुढें असतां मागील ऱ्हस्ववर्ण, माथ्यावर रेफ ज्याच्या म्हणजे र्क र्त असे, वर्गांतील प्रथम व द्वितीय यांचा योग म्हणजे **च्छ, त्थ** असे, वर्गांतील तृतीय व चतुर्थ यांचा योग म्हणजे **द्ध, ब्भ** असे, त्याचा त्याशींच योग म्हणजे **च्च, त्त** असे, आणि **श, ष,** हे व 'ट ठ ड ढ' या प्रकारचे कठोर वर्ण जींत असतात, तीं वृत्ति **परुषा** किंवा **आरभटी** होय.

### उदाहरण-सवाई वामनी

**तो दशकंठ अकुंठ विसां भुजिं तें विषकंठधनू उचली,**
**कष्टत कोष्ठवरी द्विजओष्ठहि चाउनि जा जरिनें खचली ॥**
**चाप उरीं दडपे झडपे मग आननपंक्ति धरे रचली,**
**वासुनि दांत मुखांत दहांत पडे मति गाढ तमीं पचली ॥ १ ॥**

## श्लोक मोरोपंती

### ( बृहद्दशम, बाणासुरयुद्ध )

पराभूतिक्रोधानळमुखकटाहांत कढला,
हटें युद्धोत्साहें नवदृढरथीं बाण चढला ॥
सशस्त्रें अत्युग्रें उचलुनि भुजांचीं दशशतें,
पुन्हा दावी वीर्य प्रभुहरिपुढें मंद शश तें ॥ १ ॥

तो ज्याज्या स्वभुजें गदेषुपरिघाद्यत्युग्रशस्त्रें अरी,
सोडी शौरिवरी हरीच हरिचें त्यात्या भुजाला अरी ॥
जाणों बाण वनस्पती भुजहि त्या शाखाचि यज्वा हरी,
छेदी चक्रकुठारपाणि समिधा त्या युद्धयज्ञीं करीं ॥ २ ॥

शंभो[1] विश्वगुरो तुम्ही वदतसां जें कीं दयाशेवधी,
आम्हीं तेंचि करूं प्रियप्रभु तुझ्या कोण प्रियातें वधी ॥
युष्मन्निश्चय मानला मज न मी मारीन दासां बळी,
याचा जन्मद हाहि साधु तुमच्या सद्भक्तिची सांबळी, ॥ ३ ॥

पूर्वींच स्वकरें हिरण्यकशिपुप्राणांत केल्यावर,
प्रल्हादासि अवध्य अन्वय तुझा ऐसा दिला म्यां वर ॥
दर्पाच्या शमनार्थ निष्ठुरतसा झालों भुजच्छेदना,
चित्तीं तापद दर्पसर्प न बरा हे थोडकी वेदना ॥ ४ ॥

बाणीं बाहुसहस्त्र शत्रुशमना जे जे तुम्हीं स्थापिले,
अन्यायी मदशत्रुपोषकचि ते या कारणें कापिले ॥
युष्मद्दत्तसुदर्शनें खळवधश्रद्धावशें राखिले,
चार त्वद्भजनार्ह मद्भुज जसे शुद्धें यशें माखिले ॥ ५ ॥

**प्रश्न.**–प्रसादगुणाची व्यंजक जी **प्रौढा** किंवा **सात्वती** वृत्ति ती कोणती ?

**उत्तर.**–कांहीं **मधुरा** व कांहीं **परुषा** मिळून जी होते ती वृत्ति **प्रौढा** किंवा **सात्वती** होय.

---

टीप:–१. ही शिवाप्रत कृष्णाची उक्ति आहे.

## उदाहरण

( श्लोक वामनी सीतास्वयंवर )

सखीशीं असें बोलतां सारसाक्षी,
कृपाल्किन्न तो होय संसारसाक्षी ॥
तिला आणि सर्वां जशी देव दावी,
तसी गोड एथूनी लीला वदावी ॥ १ ॥

मंडपांत मग जी जनकाच्या,
त्या स्वयंवरवधूजन काच्या ॥
अंगणांत विभु ये कनकाचा,
या प्रभा म्हणति लोक न काचा ॥ २ ॥

रामचंद्र उठतां जनकाच्या,
मंडपीं नवरिच्या जनकाच्या ॥
या वयांतहि जगज्जनकाच्या,
न प्रभा म्हणति सज्जन काच्या ॥ ३ ॥

**प्रश्न.**–ह्या **वृत्तींस** अनुकूळ अशीं पदें आहेत काय ?

**उत्तर.**–होय, तीं साहा प्रकारचीं आहेत. **कठोर, प्राकृत, ग्राम्य, कोमल, नागर व उपनागर.**

**प्रश्न.**–वृत्तिपरत्वेंकरून वृत्तेंहि अनुकूळ प्रतिकूळ आहेत काय ?

**उत्तर.**–होय, आहेत तर.

**प्रश्न.**–कोणत्या **वृत्तीला** कोणतीं **वृत्तें** अनुकूळ आहेत तीं सांगावीं.

**उत्तर.**–तीं पुढें सांगितल्याप्रमाणें आहेत.

१. सर्व **आर्यावृत्तें, मालती, प्रहर्षिणी, मंजुभाषिणी, वसंततिलका, हरिणी, मंदाक्रांता, पुष्पिताग्रा, मारभारिणी,** इतकीं वृत्तें **मधुरा** वृत्तीला अनुकूळ आहेत; इतरांस नव्हेत.

२. **पृथ्वीवृत्त हें परुषा** वृत्तीला मात्र शोभतें, अन्य **वृत्तीला** शोभत नाहीं.

३. बाकीचीं वृत्तें **प्रौढा** वृत्तीस शोभतात.

**प्रश्न.**–**मुक्तक, युग्मक,** इत्यादिक संज्ञा कोणास आहेत ?

**उत्तर.**–श्लोकादिक जीं पद्यें त्यांत ज्या पद्याचा अन्वय संपूर्ण त्याच एका पद्यांत असतो, त्याला **मुक्तिक** असें म्हणतात. दोन पद्यें मिळून अन्वय

असल्यास त्याला **युग्मक** किंवा **संदानितक** असें म्हणतात. तसेंच तीन पद्यें मिळून अन्वय असल्यास **विशेषक**, चार पद्यें मिळून अन्वय असल्यास **कालापक**, आणि पांच पद्यें मिळून असल्यास **कुलक**, **असें** म्हणतात. ह्यांत **मुक्तकां**तील **रीति** व **वृत्ति** ह्या त्यांतील **रस** जसा असेल तदनुसारच असतात. परंतु **युग्मका**दिकांत असणें त्या **वैदर्भी भिन्नरीति** व **मधुरा भिन्नवृत्ति** असाव्या इतका विशेष आहे.

**प्रश्न.**–ह्या **तीन गुणां**खेरीज आणखी **गुण** आहेत काय?

**उत्तर.**–होय. **श्लेष, प्रसाद, समाधि, समता**, इत्यादिक बहुत **गुण** कितीएकांच्या मतें आहेत, त्यांची याद अर्थासुद्धां वेगळीच दिली आहे ती पहावी. त्या **गुणांपैकीं** कित्येक **गुण** तर **दोषनिरासार्थ** स्वीकारिले आहेत व कित्येक गुणांचा अंतर्भाव वरील तीन गुणांतच होतो; जसें, **कर्णकटुत्वरू**पदोषानिरासार्थ **सुकुमारता** स्वीकारली आहे. **ग्राम्यत्व**रूपदोषनिरासार्थ **कांति** स्वीकारली आहे; असेच दुसरे कितीएक गुण दोषनिरासार्थ स्वीकारिले आहेत. आणि ज्यांत बहुत पदांचा एक्या पदाप्रमाणें भास होतो तो **श्लेष** व आरोहावरोहक्रमरूप **समाधि**, व विकटबंधरूप **उदारता**, असेच **प्रौढी, विस्तार, संक्षेप, अर्थव्यक्ति** इत्यादिक गुण यांचा वरील तीन गुणांत अंतर्भाव होतो, म्हणून तीनच गुण मुख्य आहेत असें जाणावें.

**प्रश्न.–रसानरूप** व **गुणानुरूप** रचनादिक असतात; परंतु ह्यांत कधीं फेरफार होतो काय?

**उत्तर.**–होय. **वक्ता, प्रबंध** इत्यादिकांच्या अनुरोधानें रचनेचा फेरफार करणें उचित व योग्य आहे. जसें, **शृंगाररस** प्रस्तुत असतां तेथें कोमलरचनाच उक्त आहे; परंतु त्यांतील **वक्ता** जर कोपयुक्त आहे तर त्याहि रसांत **कठोर** रचनाच शोभते. अशीच क्वचित् **प्रबंधाच्या** अनुरोधानेंहि रचना फिरते. ह्याप्रमाणेंच आणखीहि औचित्यानुरोधानें फेरफार होतो असें जाणावें.

## गुणांची याद

१. **श्लेष.**–बहुत पदांचें एक पदाप्रमाणें जें भासमानत्व तो.

२. **प्रसाद.**–पदें प्रसिद्धार्थवाचक असणें. [ अक्लिष्टता. ]

३. **समता.**–अवैषम्येंकरून जें कथन ती. ( प्रक्रमभंगाभाव. )

४. **माधुर्य**.–पृथक् पृथक् पदें असणें.
५. **सुकुमारता**.–कोमल अक्षरें असणें.
६. **अर्थव्यक्ति**.–वाक्य संपूर्ण असणें.
७. **उदारत्व**.–विकट अक्षरयुक्त बंध असणें.
८. **कांति**.–उज्वलबंध असणें. ( अग्राम्यत्व. )
९. **उदात्तता**.–योग्य विशेषणें असणें. ( उचित. )
१०. **ओज**.–मोठमोठे लांबट समास असणें.
११. **सुशब्दता**.–सुबंत तिन्ङत यांची शुद्धता ती. ( च्युतसंस्काराभाव. )
१२. **प्रेयान्**.–चांगल्या चांगल्या शब्दांनीं अतिप्रिय असें कथन. (अपरुषत्व.)
१३. **और्जित्य**.–गाढबंधत्व. ( विसंध्यभाव. )
१४. **विस्तर**.–उक्तार्थाचें विस्तारानें प्रपंचन तो.
१५. **समाधि**.–आरोहावरोहक्रमरूप जो बंध तो.
१६. **सूक्ष्मता**.–शब्दांची अंतःसोज्ज्वलरूपता ती.
१७. **गांभीर्य**.–ध्वनियुक्तत्व.
१८. **संक्षेप**.–संक्षेपानें अर्थकथन तो.
१९. **भावुक**.–भावपूर्वक वाक्य असणें.
२०. **संमितत्व**.–अर्थाला पुरेशीं पदें असणें.
२१. **प्रौढी**.–उक्तीचा जो परिपाक ती.
२२. **रीति**.–उपक्रमाप्रमाणें निर्वाह करणें.
२३. **उक्ति**.–चतुर भाषण. ( अश्लीलभिन्नत्व. )
२४. **गति**[१].–स्वराच्या आरोहावरोहाची रमणीयता.

१. या गुणांपैकीं कितीएक गुण शब्दरचनासंबंधाचे व कितीएक गुण अर्थ संदर्भसंबंधाचे आहेत, असें जाणावें.

# प्रकरण साहावें

## अलंकार

**प्रश्न.–अलंकार** कशास म्हणतात व ते किती प्रकारचे आहेत?

**उत्तर.**–शरीरास शोभा देणारे जे कंठी, चौकडा इत्यादिक पदार्थ यांस **अलंकार** म्हणतात; त्याप्रमाणेंच **अनुप्रास, उपमा** इत्यादिक हे काव्यास शोभा देतात, म्हणून त्यांसहि काव्यज्ञ पुरुषांनीं **अलंकार** हें नांव दिलें आहे. ते दोन प्रकारचे आहेत, **शब्दालंकार** व **अर्थालंकार.**

**प्रश्न.–शब्दालंकार** कोणते व त्यांचे भेद किती आहेत?

**उत्तर.**–शब्दरचनाद्वारा काव्यास शोभा देतात, ते **शब्दालंकार** होत. त्यांचे मुख्य तीन भेद आहेत. **अनुप्रास, यमक,** आणि **चित्र.**

**प्रश्न.–अनुप्रास** केव्हां होतो?

**उत्तर.**–एक किंवा अनेक व्यंजनांची आवृत्ति आली असतां **अनुप्रास** होतो. जसें;

**श्लोक (वामनी)**

**वंशी नादनटी तिला कटितटीं खोवोनी पोटीं पटीं,**
**कक्षे वामपुटीं स्वशृंगनिकटीं वेताटिही गोमटी ॥**
**जेवी नीरतटीं तरूतळवटीं श्रीश्यामदेहीं उटी,**
**दाटी व्योमघटीं सुरां सुखलुटी घेती जटी धूर्जटी ॥ १ ॥**

ह्या श्लोकांत '**ट्**' ह्या व्यंजनांची वारंवार आवृत्ति आली आहे, म्हणून हा **अनुप्रास** अलंकार झाला. **छेकानुप्रास, वृत्त्यनुप्रास,** अंत्यानुप्रास, **श्रुत्यनुप्रास** असे ह्याचे अनेक भेद आहेत.

**प्रश्न.–लाटानुप्रास** नामें शब्दालंकार आहे तो कोणता?

**उत्तर.**–अर्थसहित शब्दांची आवृत्ति आली असतां **लाटानुप्रास** होतो. जसें;

**"फिरविते हरिणाक्षि निजाक्षि ते"**

ह्या उदाहरणांत '**अक्षि**' ह्या शब्दाची अर्थासहित आवृत्ति आली आहे, अन्वय मात्र वेगळाल्या पदाशीं होतो.

**प्रश्न.**–आता **यमक** कोणतें तें सांगावें.

**उत्तर.**–जीं अक्षरें ज्या क्रमानें एकापुढें एक अशी एकदां उक्त असतात, त्याच क्रमानें त्यांची पुन: आवृत्ति आली असतां **यमक** होतें. जसें;

**श्लोक वामनी**

**फिरविजे रवि जेविं वधूगणीं,**
**अचळ तो चळतो फणिच्या गुणीं ॥**
**तनुस ते नुसते मुख वर्षतां,**
**विरमते रमते मन हर्षतां ॥ १ ॥**

ह्या श्लोकाच्या प्रथम चरणांत '**रविजे**' हीं अक्षरें एकापुढें एक अशीं ज्या क्रमानें एकदां आलीं त्याच क्रमानें त्यांची आवृत्ति आली आहे; आणि त्याचप्रमाणें द्वितीय चरणांत '**चळतो**' याची; तृतीय चरणांत '**नुसते**' याची; व चतुर्थ चरणांत '**रमते**' याची आवृत्ति आली आहे, म्हणून एथें हा **यमकनामक** शब्दालंकार झाला.

**आणखी आर्या मोरोपंती**

**साधु म्हणावे म्हणती, नर माधवदास साधु याला जे ॥**
**अतिसारी पट ज्याचे, न रमाधव दाससा धुया लाजे ॥ १ ॥**

ह्या आर्येच्या पूर्वार्धाच्या शेवटाकडील 'नरमाधवदास साधु याला जे,' इतक्या अक्षरांची यथास्थित क्रमानें उत्तरार्धाच्या अंतीं आवृत्ति आली आहे.

**आणखी उदाहरणें ( श्लोक वामनी )**

**वर्णरीति यमकीं समजा तें, तेंचि कीं विषम कीं सम जातें ॥**
**शब्द वामनशुभानुभवाचे, त्रास ते हरिति भानुभवाचे ॥ १ ॥**
**गजगती जगतीप्रति दाविते, वसुमती सुमती सुख भाविते ॥**
**स्वतनुजा तनु जाणतसे धरा, नवरि ते वरिते रघुशेखरा ॥ २ ॥**
**स्मर तिला रतिलाच न ईश तो, अतनु जो तनुजोत्तम दीसतो ॥**
**नृपति तो पतितोत्तम भासती, नवरि ते वरिते प्रभुतें सती ॥ ३ ॥**

**नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी,**
**हरी जो तापातें उचलुनि सुधासिंधुलहरी ॥**
**हरी वाटे काळा करिस विपती मृत्युभुजगा,**
**जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मजगा ॥ ४ ॥**

ह्याप्रमाणें शब्दालंकाराचीं उदाहरणें प्राकृत कविताग्रंथांत पुष्कळ आढळतात, आणखी पाहिजे असल्यास तेथें पाहावीं.

**प्रश्न.**–आतां **चित्रनामक** शब्दालंकार केव्हां होतो तें सांगावें.

**उत्तर.**–पद्मबंध, छत्रबंध, चक्रबंध, नागबंध, खड्गबंध, शिबिकाबंध, इत्यादि बंधरूप जी कविता ती असतां **चित्रालंकार** होतो. त्यांत पद्म, छत्र, चक्र इत्यादिकांच्या आकाराप्रमाणें वर्णरचनेचा आकार असतो; आणि ज्या ज्या पदार्थाच्या आकाराप्रमाणें वर्णरचनेचा आकार असतो, त्या त्या पदार्थाचें नांव त्या बंधास दिलें असतें.

## उदाहरण

**( चक्रबंध )**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | ज | गु | वि | अ |
| २ | ग | ण | प | ति |
| ३ | दी | धा | त्ति | दु |
| ४ | शा | मा | ना | र्घ |
| ५ | वि | तु | श | ट |
| ६ | श्व | झ्या | कें | ये |
| ७ | क | वि | कृ | ति |
| ८ | र्त्या | ना | त्यें | ना |

**ह्या बंधांतील श्लोक ( अनुष्टुभ् )**

**जगदीशा विश्वकर्त्या गुणधामा तुझ्याविना ॥**
**विपत्तिनाशकें कृत्यें अतिदुर्घट येतिना ॥ १ ॥**

ह्यांत **गणपतिकविकृति** हीं आठ अक्षरें साधिलीं आहेत, ह्यांत पहिलीं चार अक्षरें म्हणजे **गणपति** हीं, दोन या अंकापुढील पंक्तींत व पुढील चार अक्षरें म्हणजे **कविकृति** हीं, सात ह्या अंकापुढील पंक्तींत आणिलीं आहेत.

## अर्थालंकार

**प्रश्न.**–आतां **अर्थालंकार** कोणास म्हणावें तें, व त्यांतून मुख्यमुख्य अलंकारांचीं लक्षणें व उदाहरणें सांगावीं.

**उत्तर.**–अर्थाच्या द्वारानें काव्यास शोभा देणारे जे धर्म ते अर्थालंकार होत. त्यांतील मुख्यमुख्य अलंकारांचीं लक्षणें व उदाहरणें पुढें सांगतों.

### १.उपमा

जेथें दोन पदार्थांचें चमत्कारिक सादृश्य वर्णिलें असतें तेथें **उपमालंकार** होतो.

### उदाहरण : श्लोक

**जो धैर्यें धरसा सहस्त्रकरसा तेजें तमा दूरसा,**
**जो रत्नाकरसा गभीर शिरसा भूपां यशोहारसा ॥**
**ज्ञाता जो सरसावला नवरसांमाझारि शृंगारसा,**
**शोभे तामरसाक्ष तो नळ रसानाथ स्तवूं फारसा ॥ १ ॥**

हा नळराजाच्या गुणवर्णनाचा रघुनाथ पंडितकृत श्लोक आहे, ह्यांत धर म्हणजे पर्वत, सहस्रकर म्हणजे सूर्य इत्यादिकांचें धैर्य, प्रताप इत्यादि साधारण धर्मांवरून नळाशीं सादृश्य वर्णिलें आहे, म्हणून हा **उपमालंकार** झाला. एथें उपमान[१], उपमेय, साधारण धर्म व उपमावाचक शब्द हीं चारहि उक्त आहेत, म्हणून ही **पूर्णोपमा** होय. ह्या चोहोपैकीं कांहीं अनुक्त असलें तर तिला **लुप्तोपमा** म्हणतात.

### उदाहरण दुसरें–श्लोक

(कृ. शा. चि. कृ. प. र. वली.)

**गुणांनीं जी पूर्णा अणुसम नसे दोषहि जिला,**
**अलंकारीं साजे रस वसतसे जींत पहिला ॥**
**मृदू जीचे वर्ण श्रवणसुख देती परिसतां,**
**वसे ती पद्माक्षी मम हृदयिं जेवीं सुकविता ॥ १ ॥**

स्वकांतेच्या वियोगानें दुःखित झालेल्या पुरुषाची ही उक्ति आहे. हींत सगुणता, निर्दोषता, अलंकारकृतशोभाशालित्व, शृंगाररसशीलत्व, मृदुवर्णत्व

१. ज्याची उपमा दिली असते तें उपमान. जसें; एथें 'धर' 'सहस्त्रकर', इत्यादि. ज्याला उपमा दिली असते तें उपमेय. जसें; एथें 'नळ', सादृश्य-प्रयोजक जो धर्म तो साधारण धर्म. जसा; एथें 'धैर्य' 'तेज' इत्यादि. व सादृश्यवाचक जो शब्द तो उपमावाचक शब्द. जसा; एथें 'सा' असेंच अन्यत्र जाणावें.

ह्या साधारण धर्मास्तव सुकविता व स्वकांता यांचें सादृश्य वर्णिलें आहे. पूर्वोदाहरणांत साधारण धर्म एकच व शुद्ध असून ह्या उदाहरणांत तो अनेक व श्लेषघटित आहे, म्हणून पूर्वीपेक्षां इतका ह्यांत विशेष होय. एथेंहि सुकविता हें उपमान; पद्माक्षी हें उपमेय; सगुणता, निर्दोषता इत्यादि अनेक साधारण धर्म व जेवीं हा उपमावाचक शब्द, ह्या चारींचेंहि उपादान आहे, म्हणून हीहि **पूर्णोपमाच** होय.

### २.अनन्वय

जेथें ज्याची त्यालाच उपमा दिली असते, तेथें **अनन्वय** अलंकार होतो.

## उदाहरण

**" ह्या शाळेंत बाळ्यासारिखा कोडगा बाळ्याच आहे. "**

ह्या वाक्यांत बाळ्याचीच उपमा बाळ्याला दिली आहे म्हणून, हा **अनन्वय** अलंकार झाला.

### उदाहरण दुसरें–श्लोक

**घडे दैवें किंचित् कलुष परि संतापति मनीं,**
**अशांतें ताराया असति बहु तीर्थें त्रिभुवनीं ॥**
**जयां प्रायश्चित्तें नसति कुनरां दे गति असी,**
**समर्था या लोकीं तुजसम अये तूंचि अससी ॥ १ ॥**

वामनपंडित–गंगालहरी.

एथें "तुजसम तूंचि अससी" हा **अनन्वय** होय.

### ३.प्रतीप

जेथें प्रसिद्ध उपमेला प्रसिद्ध उपमेयाची उपमा दिली असते, तेथें **प्रतीप** अलंकार होतो.

### उदाहरण–श्लोकपाद

**"राधामुखाच्यापरि चंद्र शोभतो."**

ह्या उदाहरणांत चंद्र हें प्रसिद्ध उपमान असून त्याला मुखाची उपमा दिली, म्हणून हा **प्रतीप** अलंकार झाला.

### ४.रूपक

जेथें **उपमान व उपमेय** ह्यांचा अभेद वर्णिला असतो, तेथें **रूपकालंकार**

होतो. जसें; " ह्या पुरुष औदार्याविषयीं केवळ **कर्ण** आहे." ह्या वाक्यांत कर्ण हें उपमान आणि पुरुष हें उपमेय ह्यांचा अभेद वर्णिला आहे.

### अथवा आर्या मोरोपंती

**दुष्यंतसद्मपद्मीं तो स्त्री श्रीकण्वभानु शिष्य करीं ॥**
**नेली पुत्रसुगंधासह धर्मनयांबुपूर्ण नगरसरीं ॥ १ ॥**

ह्या आर्येंत दुष्यंतसद्म, स्त्री, कण्व, शिष्य, पुत्र, धर्मनय, आणि नगर, **हीं उपमेयें,** ह्यांशीं अनुक्रमें पद्म, श्री, भानु, (सूर्य), कर (किरण), सुगंध, अंबु (उदक), सर (सरोवर) हीं **उपमानें** ह्यांचा अभेद वर्णिला आहे.

### ५.उल्लेख

अनेक धर्मांनीं युक्त जी वस्तु त्या वस्तुला त्या त्या धर्माच्या योगानें अनेकांनीं अनेक प्रकारें मानिलें असतां तेथें **उल्लेख** अलंकार होतो.

### उदाहरण : श्लोक वामनी

**मल्लां वज्र गमे नरां नृप गमे काम स्वयें स्त्रीजना,**
**गोपां आप्त खलां नृपप्रभु शिशू मातापित्यांच्या मना ॥**
**कंसा मृत्यु अशक्त पामरजनां संतांस तत्वामृत,**
**श्रीशेषासन यादवां हरि दिसे रंगांत रामान्वित ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत एकाच श्रीकृष्णास मल्लादिकांनीं बलाढ्यत्वादिकांच्या योगानें वज्रादि अनेक रूपेंकरून मानिलें आहे.

### ६.स्मृति, ७.भ्रांति, आणि ८.संदेह

जेथें एका वस्तूच्या दर्शनादिकेंकरून तत्सदृश अशा अन्य वस्तूचें स्मरण, भ्रांति, किंवा संशय, वर्णिला असतो तेथें **स्मृति, भ्रांति,** व **संदेह** हे अलंकार क्रमानें होतात.

### उदाहरणें–श्लोक ( अनुष्टुभ् )

१. " **पंकजा पाहतां माझ्या, मनीं कांतास्य येतसे** "
२. " **मत्त झाला अली मानी, त्वन्मुखा पद्म हें असें** "
३. " **हें पद्म किंवा शीतांशू, हा निर्णय अम्हां नसे** "

एथें प्रथम उदाहरणांत **स्मृत्यलंकार**, दुसऱ्या उदाहरणांत **भ्रांत्यलंकार** व तिसऱ्या उदाहरणांत **संदेहालंकार** आहे.

## ९.अपन्हुति

**उपमेयावर उपमानाचा** आरोप करण्याकरितां **उपमेयाच्या** स्वरूपाचा अपलाप केला असतो, तेथें **अपन्हुति** अलंकार होतो. जसें; फार दिवस पाऊस उघडून एकाएकीं आला असतां लोक म्हणतात कीं, "**ही जलवृष्टि नव्हे, तर अमृतवृष्टिच** होत आहे." ह्या वाक्यांत जलावर अमृतत्वाचा आरोप करण्याकरितां जलत्वाचा अपलाप केला आहे.

### उदाहरण दुसरें–आर्या ( मोरोपंती )

**सखिहस्तीं[१] हस्त न वृष, पांडवहृदयांत सायका मारी ॥**
**क्रोधातें भीम गिळी, गरळातें जेवि काय कामारी ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत हातावर हात मारणें ह्याच्या स्वरूपाचा अपलाप करून त्याच्या ठायीं बाण मारणें ह्याचा आरोप केला आहे.

### आणखी श्लोक

**नोहे नभोमंडल वारिराशी, न तारका फेनचि हा तयाशी ॥**
**न चंद्र हा नावचि चालताहे, न अंक हा तीवर शीड आहे ॥ १ ॥**

ह्या अलंकाराचे **हेत्वपन्हुति, पर्यस्तापन्हुति** इत्यादिक अनेक भेद आहेत, ते विस्तारभयास्तव एथें सांगत नाहीं.

## १०.उत्प्रेक्षा

**उपमेयावर** जाणों हें **उपमानच** आहे काय अशा रीतीनें संभावना केली असते, तो **उत्प्रेक्षा**नामक अलंकार होय.

### उदाहरण–आर्या ( मोरोपंती )

**सानुज सदार दुर्जन, दुर्योधन खेचरेश्वरें धरिला ॥**
**जाणों क्षितिहृदयींचा, साक्षात् कांटाचि तो समुद्धरिला ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत दुर्योधनाच्या ठायीं पृथ्वीच्या हृदयांतील कांट्यांची संभावना केली आहे, म्हणून हा **उत्प्रेक्षालंकार** होय.

## ११. रूपकातिशयोक्ति

जेथें **उपमान**वाचक पदानेंच **उपमेयाचा** बोध होतो, **उपमेय**वाचक पद

---

१. द्रौपदीला द्यूतांत जिंकतांच कर्णानें दुर्योधनाच्या हातावर हात मारला.

उक्त नसतें, तेथें **रूपकातिशयोक्तिनामक** अलंकार होतो. जसें; स्वकृत जानकीपरिणय नाटकांतील,

**श्लोक**

**खालीं चंद्र, वरी पयोद, गगनीं सद्वापिका शोभते,**
**आकाशावर दोन शैल रचिले अत्युन्नत स्पष्ट ते ॥**
**तैसें सैकत ऊर्ध्व, खालि कदलीकांडें अधोवक्र हीं,**
**कामें निर्मियली नवी सुचतुरें अन्यादृशी सृष्टि ही ॥ १ ॥**

या श्लोकांत स्त्रीच्या मुखादि अवयवांची स्थिति मनांत आणून त्यांचें हें वर्णन केलें आहे. यांत मुखरूपी चन्द्र खालीं असून त्याच्या वरतीं ( कृष्णवर्ण ) केशरूपी पयोधर म्हणजे मेघ आहे. ( अदृश्य ) जें मध्यभागरूपी गगन, त्या गगनांत नाभिरूपी वापिका आहे. मध्यरूपी आकाश खालीं असून त्याच्या वरतीं स्तनरूपी दोन शैल म्हणजे पर्वत आहेत. नितंबरूपी सैकत म्हणजे वाळवंट वरतीं असून ऊरुद्वयरूपी ( मांड्यांच्या रूपानें ) कदलीकांडें म्हणजे केळीचे खांब हे खालीं असून तेहि अधोमुख आहेत. ह्याप्रमाणें कामदेवानें ही ( स्त्रीरूप ) सृष्टि ( ब्रह्मदेवानें निर्मिलेल्या सृष्टीहून ) विलक्षणच निर्माण केली आहे. असा या श्लोकांतील भावार्थ आहे.

यांत **चन्द्र, पयोद, गगन, शैल, सैकत,** व **कदलीकांडें** या उपमानवाचक पदांनींच त्यांचीं उपमेयें जीं **मुख, केश, मध्यभाग, स्तन, नितंब** व **ऊरु** या उपमेयवाचक पदांचें ग्रहण होतें; म्हणून येथें हा **रूपकातिशयोक्तिनामा** अलंकार झाला.

**आणखी श्लोक ( नवीन )**

**येथें एक असे सुवर्णलतिका, जी चालते बोलते,**
**आले पद्म तिच्यावरी अतिशयें जें कान्तिनें शोभतें ॥**
**त्या पद्मींच विराजती कुवलयें हीं दोन कैसीं पहा,**
**ऐसी अद्‌भुत सृष्टि देखुनि मला वाटे चमत्कार हा ॥ १ ॥**

सोन्याची लता असून तीहि चालणारी व बोलणारी असणें, व त्या लतेला पद्में येणें व त्या पद्मांतहि दोन कुवलयें असणें ही गोष्ट सृष्टिविलक्षण असल्यामुळें अद्‌भुत होय, असें या श्लोकांत एका सुंदर तरुणीचें वर्णन एका कवीनें केलें आहे.

येथें **सुवर्णलतिका** म्हणजे स्त्री, **पद्म** म्हणजे तिचें मुख व **कुवलयें** म्हणजे तिचीं नेत्रें हा अर्थ विवक्षित आहे.

ह्या श्लोकांत **सुवर्णलतिका, पद्म** व **कुवलयें** या उपमानवाचक पदांनींच त्यांचीं उपमेयें जीं **स्त्री, मुख** व **नेत्रें** त्यांचें ग्रहण होतें, म्हणून हाहि **रूपकातिशयोक्ति**नामा अलंकार झाला.

## १२.संबंधातिशयोक्ति

संबंध नसताहि संबंध वर्णिला असतो, तेथें हा अलंकार होतो. जसें;

### श्लोकार्ध ( र. पं. कृ. )

**" जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे,**
**तो चंद्रमा निजतनूवरि डाग लाहे "**

एथें घोड्याच्या खुराचा व चंद्राचा संबंध नसताहि संबंध वर्णिला आहे. संबंध असूनहि असंबंध वर्णिला असतां हाच अलंकार होतो.

## १३.दीपक

कोण्या एक्या पदार्थाचें वर्णन कर्तव्य असतां त्या पदार्थावर राहाणारा धर्म ज्यावर राहतो, अशा दुसऱ्याहि पदार्थाचें त्याच्या बरोबर वर्णन केलें असतां **दीपक** अलंकार होतें. जसें,

### श्लोकार्ध

**" मदानें शोभतो हत्ती, प्रतापानें महीपती "**

एथें राज्याचें वर्णन कर्तव्य असून त्यावर राहणारी शोभा हत्तीवरहि राहते, म्हणून राजाबरोबर हत्तीचेंहि वर्णन केलें; यास्तव हें **दीपक** झालें.

## १४.दृष्टांत

प्रकृत जो विशेषार्थ त्याच्या बोधासाठीं अप्रकृत अशा विशेष अर्थाचा दाखला देणें, तो **दृष्टांत** होय जसें;

### आर्या ( मोरोपंती )

**करिल कसें मांजर जें, दुष्कर हरिहनन काज वाघांस ॥**
**न शकति अग्नि विधु कसा, दिनमणिचा करिल काजवा घांस ॥१॥**

एथें 'वाघांसहि दुष्कर जें सिंहहननरूप कार्य, तें मांजर कसें करील?' हा विशेष अर्थ प्रकृत असून त्याच्या प्रतिपत्यर्थ, 'अग्नि आणि चंद्र यांनाहि अशक्य जें सूर्याचा घांस करणें तें काजवा कसें करील'? ह्या अप्रकृत अशा विशेष अर्थाचा दाखला दिला आहे.

**आणखी आर्या ( मोरोपंती )**

**परकरगस्वकलत्र स्पर्शेंचि महायशाशि वाहविते ॥**
**कोण प्राज्ञ म्हणेल, श्वा शिवला जा तशा शिवा हवि तें ॥ १ ॥**

एथें स्वकीय़ स्त्री परपुरषाशीं संगत झाली असतां तिचा स्वीकार करूं नये, कां कीं ती अपवित्र होते, ह्या विशेष अर्थास, कुतरें शिवलेलें हविर्द्रव्य उपयोगी नव्हे, कां कीं तें अशुद्ध होय; ह्या विशेषार्थाचा दाखला दिला आहे.

**आणखी आर्या ( मोरोपंती )**

**पडतांच भीष्म गेले, सर्वांचेही पळांत आवांके ॥**
**नसतां धुरंधर वृषभ, बाळ वृषभरें करोनि, आ वांके ॥ १ ॥**

एथें 'भीष्म पडल्यावर सर्वांचे आवांके गेले' ह्या प्रकृत विशेष अर्थास 'मुख्य धुरेचा बैल नसतां लहान बैल भारानें आ करोनि वांकतो' ह्या अप्रकृत विशेष अर्थाचा दाखला दिला आहे.

**आणखी आर्या ( मोरोपंती. )**

**अक्षज्ञ नसोनि भरीं भरला स्वगुणेंचि अर्थ हारविला ॥**
**पडतां गांठ गतश्री होय शशी दोष काय हा रविला ॥ १ ॥**

ही **बलरामाची दुर्योधनतर्फे श्रीकृष्णाप्रत** उक्ति आहे. या उक्तींत **धर्मराजाला** द्यूत खेळतां येत नसूनहि तो द्यूत खेळण्याच्या भरीस भरून त्यानें होऊन अर्थ हारविला, याचा दोष दुसऱ्याकडे नाहीं. हा विशेष अर्थ प्रस्तुत असून त्याच्या पुष्टचर्थ, चन्द्र हा सूर्याची गांठ पडली असतां गतश्रीक होतो हा दोष सूर्याकडे नाहीं, या अप्रस्तुत विशेष अर्थाचा दाखला दिला आहे, म्हणून हा **दृष्टांतालंकार** झाला.

## १५.निदर्शना

परस्पराशीं सदृश असे जे वाक्यार्थ त्यांचा अभेद वर्णिला असतां **निदर्शनालंकार** होतो. जसें; "मूर्खास उपदेश करणें हें पालथ्या घागरीवर पाणी घालणें होय." ह्या उदाहरणांत 'मूर्खास उपदेश करणें', व 'पालथ्या घागरीवर पाणी घालणें' ह्या दोन वाक्यांच्या अर्थाचा अभेद वर्णिला आहे.

**आणखी आर्या ( मोरोपंती )**

**त्वद्रत्नतस्कराला, केला मीं बोध फार आरडलों ॥**
**अंधभसितबधिरीं तें, दीपहवन गीत कीं वनीं रडलों ॥ १ ॥**

हें **रामचंद्राप्रत** बिभीषणाचें वाक्य आहे. ह्या वाक्यांत रावणाला बोध करणें ह्या वाक्यार्थाचा, 'अंधास दीप दाखविणें,' 'भस्मांत होम करणें,' 'बहिऱ्यास गाणें ऐकविणें,' आणि 'रानांत रडणें,' ह्या वाक्यार्थाशीं अभेद वर्णिला आहे.

आपल्या सत् अथवा असत् अशा व्यापारानें दुसऱ्यास सत् अथवा असत् व्यापाराची सूचना किंवा बोध करणें, तेथें क्रमेंकरून **सदर्थनिदर्शना** व **असदर्थनिदर्शना** हे अलंकार होतात.

**उदा० सदर्थनिदर्शनेचें : श्लोक (अनुष्टुभ्)**

**सूर्य येतां ऊदयाला, लक्ष्मी देतो कमळाला ॥**
**एणें बोधी लक्ष्मी फळ, आत्मपोषण केवळ ॥**

ह्या उदाहरणांत सूर्य ह्या आपल्या सद्व्यापारेंकरून इतरांस सद्व्यापाराचा बोध करतो हा अर्थ वर्णिला आहे.

**उदा० असदर्थनिदर्शनेचें : ( अभंग )**

**चंद्रमा उदया येतां क्षीणता तम पावतें ॥**
**एणें सुचवितें लोका राजद्रोह नव्हे निका ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत तम हें स्वकीय राजद्रोहरूप असद्व्यापाराचें असत् फळ असें चंद्रोदयीं आपल्या क्षीणत्वानें बोधिद करितें.

## १६.सहोक्ति

जेथें चमत्कार वाटायाजोगा सहभाव वर्णिला असतो, तेथें **सहोक्तिनामा** अलंकार होतो.

**उदाहरण–आर्या ( मोरोपंती )**

**जेव्हां सुगल मरुत्सुत लक्ष्मण तारासुतादि वीरमणी ॥**
**म्हणति विभो भेटेल, क्षितिजेसह कीर्ति ही नवी रमणी ॥**

हें **रामचंद्राप्रत सुग्रीव मारुति** इत्यादिकांचें वाक्य आहे. ह्या वाक्यांत **सीता** आणि **कीर्ति** ह्यांचा सहभाव चमत्कारिक रीतीनें वर्णिला आहे.

## १७.परिकर

जेथें विशेषण सहेतुक असतें तेथें **परिकरालंकार** होतो.

**उदाहरण ( आर्या मोरोपंती )**

**कीं पतित पति त्यागुनि, विश्वशरण्याकडे रडत वाटे ॥**
**आली जी लंकाश्री, तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत विश्वशरण्या ( विश्वालाहि शरण जाण्यास योग्य ) हें **रामचंद्राला** विशेषण दिलें तें सहेतुक आहे, म्हणून एथें **परिकारालंकार** झाला.

### अथवा आर्या (नवीन)

**श्रीशा सर्वज्ञातें, सर्वेशातें त्यजोनि जोडुं कर ॥**
**जांतो दुर्धनिकाप्रति, साधु म्हणति नर नव्हेचि तो डुकर ॥**

ह्या उदाहरणांत **श्रीश, सर्वज्ञ, सर्वेश्वर,** हीं **ईश्वरास** विशेषणें दिलीं तीं सहेतुक आहेत, म्हणून हाहि **परिकरालंकार** होय.

### १८.श्लेष

जेथें शब्दांचे अनेक अर्थ विवक्षित असतात, तेथें **श्लेषालंकार** होतो. ह्याचे दोन भेद, **अभंगश्लेष,** आणि **सभंगश्लेष;** ज्यांत एकाच शब्दाचे अनेकार्थ असतात तो अभंगश्लेष, व ज्यांत एका अर्थाचे वेळीं जीं पदें दुसऱ्या अर्थाच्या वेळीं असत नाहींत; त्याच्यांत कमजास्त करून निराळींच पदें काढावीं लागतात, तो **सभंगश्लेष होय.**

### उदाहरण अभंगश्लेषाचे ( आर्या )

**वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी ॥**
**पक्ष श्रीहरि धरि भग, काय न करितो अनंत मायावी ॥ १ ॥**

ह्या स्थलीं मयूर, शुक, द्विजोत्तम, पक्ष ह्या पदांचे दोन अर्थ विवक्षित आहेत, म्हणजे एकदां मोर, पोपट पक्षिश्रेष्ठ व पंख; आणि दुसऱ्या वेळेस **मोरोपंत, शुकाचार्य, ब्राह्मण,** आणि **बाजू** असे अनुक्रमानें आहेत, म्हणून हा **अभंगश्लेष** होय.

### अथवा आर्या ( मोरोपंती )

**तूं मलिन कुटिल नीरस, जडहि पुनर्भवपणेंहि कचसाच ॥**
**धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजसि नाम कच साच ॥ १ ॥**

ह्या आर्येंत **कच** म्हणजे **बृहस्पतीचा** पुत्र ह्याचें साम्य केशाशीं वर्णिलें आहे. एथें मलिन इत्यादिक जीं केशाचीं विशेषणें तींच अर्थांतरानें कचाकडेहि लागू होतात.

### उदाहरण सभंगश्लेषाचें

**" नलगे औषध मजला."**

**दमयंती** विरहज्वरानें व्याकुळ झाली त्या समयीं तिच्या **सख्यांनीं** तुला काय औषध पाहिजे असें विचारल्यावरून तिनें त्यांस हें उत्तर केलें. ह्यांत एक अर्थाच्या वेळीं नल गे औषध, मजला; अशीं पदें काढावीं लागतात व दुसऱ्या अर्थाच्या वेळीं नल गे, औषध मजला अशीं पदें काढावीं लागतात, म्हणून हा **सभंगश्लेष** होय.

## १९. अप्रस्तुतप्रशंसा अथवा अन्योक्ति

जेथें प्रस्तुत गोष्टीची प्रतीति होण्याकरितां अप्रस्तुत गोष्ट सांगितली असते; प्रस्तुत गोष्टीचें साक्षात् कथन केलें नसतें, तेथें **अप्रस्तुत प्रशंसा** अलंकार होतो; ह्यालाच **अन्योक्ति** असें म्हणतात.

### उदाहरण कृ. चि. कृत

**सकल जलाशय टाकुनि, वाट तुझी हा पहात जो बसला ॥**
**त्या चातकास गारा, मारिसि मेघा न योग्य हें तुजला ॥**

ह्या उदाहरणांत इतर कोणापाशीं याचना न करितां मोठ्या आशेनें कोणी गृहस्थ रोजगार करून घरीं आल्यावर त्याजकडे याचक गेला असतां त्यानें त्याला शब्दादिकांनीं धिक्कारिलें, त्या गृहस्थाची गोष्ट प्रस्तुत आहे, तिची प्रतीति होण्याकरितां अप्रस्तुत जो मेघ त्याची गोष्ट सांगितली म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा** झाली.

## २०. व्याजस्तुति

बाहेरून स्तुति दिसावी परंतु वास्तविक निंदा असावी; किंवा बाहेरून निंदा असून वास्तविक स्तुति असावी, अशा ठिकाणीं **व्याजस्तुति** नामक अलंकार होतो. जसें, कोणी मुलगा पहिल्यापेक्षां वाईट वाचूं लागला असतां पंतोजी त्यास म्हणतो, " वाहवा! आतां तर तूं फारच चांगलें वाचूं लागलास बाबा! " ह्या वाक्यांत बाहेरून स्तुति दिसते; परंतु वस्तुतः निंदा आहे.

**अथवा दिंडी**

**वधुनि माझी हे कनकरूप काया,**
**कटक मुकुटादिक भूषणें कराया ।**
**कशी आशा उपजली तूज राया,**
**काय नाहीं तूजला दया माया ॥ १ ॥**

ही **नळराजाप्रत** हंसाची उक्ति आहे; ह्या उक्तींत बाहेरून स्तुति भासते, परंतु वास्तविक निंदा आहे.

आळशी व मूर्ख अशा मुलास दैववशात् ईर्षा उत्पन्न होऊन तो एक्या दिवशीं पहांटेस धडा पाठ करायास बसला असतां त्याप्रत त्याच्या बापाचें हें

वाक्य आहे. ह्यांत बाहेरून निंदा असून आंतून स्तुति आहे.

**निंदेच्या योगानें स्तुतीचें उदाहरण. ( वाक्य )**

**" आज एवढ्या पहाटेस उठून घडा पाठ करावयास बसलास ही अवदशा तुला कोठून आठवली ?"**

## २१.व्याजनिंदा

एकाच्या निंदेनें दुसऱ्याची निंदा होत असल्यास तेथें **व्याजनिंदानामक** अलंकार होतो. जसें; "मीच मूर्ख म्हणून तुला हें काम सांगितलें." ह्या वाक्यांत काम सांगणाऱ्यानें आपलीच निंदा करून घेतली; परंतु एणेंकरून ज्याला काम सांगितलें त्याचीच निंदा झाली.

## २२.आक्षेप

विधि स्पष्ट असून निषेध गुप्त असणें तेथें **आक्षेप** अलंकार होतो. जसें;

**अभंग**

**कांता जाशी तरी जाय, जन्म माझें तेथें होय ॥**

नायक हा मी प्रवासास जातों असें नायिकेला विचारीत असतां त्याप्रत हें नायिकेचें वचन आहे. ह्यांत 'तूं जा,' असा विधि उघड आहे; परंतु 'तूं जाशील तेथें माझा जन्म होईल.' म्हणजे तुझ्या वियोगानें माझा प्राण वांचणार नाहीं, अशा प्रकारानें 'तूं जाऊं नको' हा निषेध गर्भित केला.

## २३.विरोधाभास

**विरोधाचा** आभास मात्र असावा, वस्तुतः विरोध नसावा; तेथें **विरोधाभास** अलंकार होतो. जसें;

**अभंग**

**जरी शिव शूळधारी, निरामय आहे तरी ॥**

ही **शिवाची** स्तुति आहे. एथें जो शूळधारी तो निरामय असणें म्हणजे निरोगी असणें हा विरोध दिसतो; परंतु शूळधारी म्हणजे शूळरोगी नव्हे, तर शूळनामक शस्त्रातें धारण करणारा असा वास्तविक अर्थ आहे; म्हणून तो विरोध नव्हे.

## २४.विभावना

कारणावांचून कार्याची उत्पत्ति झाली असतां **विभावना** अलंकार होतो. जसें;

**अभंग**

**लाक्षारस न लागतां, पाद पावे आरक्तता ।।**

ह्या ठिकाणीं लाक्षारसरूप कारणावांचून आरक्ततारूप कार्य उत्पन्न झालें असें वर्णिलें आहे.

ह्याप्रमाणें कारणसामग्री पुरती नसतांहि कार्योत्पत्ति, प्रतिबंधक असतांहि कार्योत्पत्ति, भलत्याच कारणापासून भलत्याच कार्याची उत्पत्ति, व कार्यापासून कारणाची उत्पत्ति जेथें वर्णिली असते तेथेंहि **विभावनालंकारच** होतो. क्रमानें उदाहरणें :

**अभंग**

**१. " अस्त्रें तरी मृदू फार, तिहीं जगा जिंकी मार ! "**
**२. " खड्गरूप सर्प तुझा, नरेंद्राला[1] डसे राजा ! "**
**३. " शंखापासोनीयां[2] निका, वीणानाद निघे देखा ! "**
**४. " करकल्पवृक्ष तयापासोनीयां,**
**यशोर्णवराया झाला असे ! "**

एथें पहिल्या उदाहरणांत जगज्जयार्थ शस्त्ररूप कारणसामग्री असावी तशी तीक्ष्ण कठिण अशी नाहीं. दुसऱ्या उदाहरणांत नरेंद्र म्हणजे श्लेषानें विषवैद्य हा कार्योत्पत्तीला प्रतिबंध आहे. तिसऱ्या उदाहरणांत वीणानादरूप कार्य भलत्याच कारणापासून म्हणजे शंखापासून वर्णिलें आहे व चौथ्या उदाहरणांत प्रसिद्ध कार्यकारणभावाचा उलटेपणा वर्णिला आहे.

## २५. विशेषोक्ति

कारणसामग्री पुष्कळ असतांहि कार्याची अनुत्पत्ति वर्णिली असतां **विशेषोक्ति** अलंकार होतो. जसें; " समुद्रांत राहून कोरडाच ! " एथें समुद्रांत असणें हें भिजविण्यास पुष्कळ कारण असतांहि न भिजणेंच सांगितलें म्हणून एथें **विशेषोक्ति** झाली.

## २६. असंभव

जेथें कांहींएक गोष्टीची असंभाव्यता वर्णिली असते, तेथें **असंभवालंकार**

---

१. राजे, श्लेषानें विषवैद्य (त्यांसच). २. कंठ, श्लेषानें वाद्यविशेष.

होतो. जसें; " त्वरेनें वर्तमानें कळविणारीं तारायंत्रें व फौज पोंचविणाऱ्या आगगाड्या इत्यादि राज्यसंरक्षणाच्या साधनांच्या योगानें कंपनी सरकारचा अम्मल पूर्णपणें अबाधित चालत असतां हिंदुस्थानांत बंड उत्पन्न होईल, असें कोणाच्या स्वप्नांत तरी होतें काय ? "

## २७.असंगति

एके ठिकाणीं कारण असून दुसऱ्याच ठिकाणीं त्याचें कार्य होणें अशा स्थलीं **असंगति**नामा अलंकार होतो. जसें १. " राम्यास गळूं आणि लख्यास अवधणा ! " २. " घटिका पाणी पितें आणि घड्याळ टोले खातें ! " इत्यादि स्थलीं **असंगति** अलंकार जाणावा.

## २८.संभावन

असें झालें तर असें होईल, असा तर्क करणें ह्यास **संभावन** म्हणतात. जसें; " आत्याबाईला मिशा असत्या तर तिला काका म्हटलें असतें ! " ह्या स्थलीं **संभावनालंकार** झाला.

## २९.सार

जेथें उत्तरोत्तर गुणादिकांचें आधिक्य वर्णिलें असतें तेथें, **सार** अलंकार होतो. जसें;

### श्लोक

**उत्तरोत्तर[1] उत्कर्षा सार पंडित बोलती ॥**
**मद्याहुनि सुधा गोड तीहूनी कविभारती ॥ १ ॥**

एथें मद्य इत्यादिकांच्या गोडपणाचा उत्तरोत्तर उत्कर्ष वर्णिला आहे.

## ३०.यथासंख्य

जेथें क्रमानें उक्त जे पदार्थ, त्यांचा अन्वय क्रमेंकरून दुसऱ्या पदार्थांशीं असतो, तेथें **यथासंख्य** होतें. जसें;

### अभंग

**घरा येतां वधूवर, चोळी पागोटें आहेर ॥**

---

१. ह्या श्लोकाचे पूर्वार्धांत अलंकाराचें लक्षण व उत्तरार्धांत त्याचें उदाहरण बांधिलें आहे.

एथें **वधू**ला चोळी आणि **वरा**ला पागोटें, असा क्रमानें अन्वय विवक्षित आहे, म्हणून एथें **यथासंख्यालंकार** झाला.

## ३१.परिवृत्ति

जेथें अधिकाची आणि उण्याची परस्परें अदलाबदली होते, तेथें **परिवृत्ति अलंकार** होतो. जसें; " आवळा देऊन बेल काढणें. " एथें आवळा उणाख आणि बेल हें मोलानें अधिक अशी विवक्षा आहे.

## ३२.काव्यार्थापत्ति

असें आहे मग असें होईल हें सांगणें कशास पाहिजे ? अशा प्रकारचें वर्णन असतें तेथें **काव्यार्थापत्ति**नामा अलंकार होतो.

## उ० आर्या मोरोपंती

**तव सेवक मर्यादाविलंघनीं मात्र आन हे सकती**
**प्लवग तवांघ्रिप्लवगत, तरले भवसिंधु हा समुद्र किती ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत " प्लवग म्हणजे वानर हे तुझ्या चरणरूप नौकेच्या योगानें भवसमुद्रहि तरले, मग हा सामान्य समुद्र तरतील म्हणून काय सांगावें. " असें कैमुतिक न्यायानें वर्णन केलें आहे, म्हणून हा **काव्यार्थापत्ति**नामा अलंकार झाला.

"तो बापास बाबा म्हणत नाहीं. मग चुलत्यास काका कोठून म्हणणार?" " वरमाय शीतळ मग वऱ्हाडणीस काय बोल ? " इत्यादि स्थळीं **काव्यार्थापत्तिच** होते.

## ३३.काव्यलिंग

समर्थनीय जो अर्थ त्याचें समर्थन केलें असतां **काव्यलिंग** होतें. जसें;

## आर्या

**हे दुष्टा कंदर्पा, मजशीं तूं चालवूं नको नखरे,**
**माझ्या चित्तीं वसतो, तो श्रीशिव जाण हें मनांत खरें ॥ १ ॥**

ही एके भक्ताची मदनाप्रत उक्ति आहे. या उदाहरणांत " **मजशीं तूं** चालवूं नको नखरे " या अर्थाच्या समर्थनार्थ माझ्या चित्तीं **तो** म्ह० प्रसिद्ध ( तुला जाळून टाकणारा ) **श्रीशिव** वास करितो, हा अर्थ वर्णिला म्हणून येथें **काव्यलिंग**नामक अलंकार झाला.

## ३४.अर्थान्तरन्यास

सामान्य अर्थ प्रकृत वर्णनीय असून त्याच्या प्रतिपादनार्थ अप्रकृत अशा विशेष अर्थाचें कथन केलें असतें; अथवा विशेष अर्थ प्रकृत असून त्याच्या प्रतिपादनार्थ सामान्य अशा अप्रकृत अर्थाचें कथन केलें असतें; तेथें **अर्थांतरन्यास** अलंकार होतो.

**उदाहरण-श्लोक: (अनुष्टुभ)**

**गुणवद्वस्तुसंबंधें अल्पही गुरु होतसे ॥**
**पुष्पमालानुषंगानें सूत्रही मस्तकीं वसे ॥**

एथें गुणवानाच्या योगानें अल्पासहि महत्त्व प्राप्त होतें; हा सामान्य अर्थ पूर्वार्धांत सांगितला आहे, त्याच्या प्रतिपादनार्थ पुष्पमालेच्या योगानें सूत्रहि मस्तकीं धारण करण्यांत येतें. ह्या विशेष अर्थाचें कथन उत्तरार्धांत केलें आहे.

**उदाहरण दुसरें: श्लोक (वामनी)**

**सिंहाचा जो बाल तोही चपेटा,**
**मारी त्याला जो करी मत्त मोठा ॥**
**तेजस्वी जे वृत्ति ऐसीच त्यांची,**
**तेथें कांहीं चाड नाहीं वयाची ॥ २ ॥**

**उदा० तिसरें: श्लोक रघुनाथपंडिताचा (नळचरित्र)**

**तदितर खग भेणें वेगळाले पळाले,**
**उपवनजळकेली जे कराया मिळाले ॥**
**स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो,**
**कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ २ ॥**

एथें प्रथम श्लोकाच्या पूर्वार्धांत विशेष अर्थ सांगितला. त्याच्या प्रतिपादनार्थ उत्तरार्धांत सामान्य अर्थाचें कथन केलें आहे आणि दुसऱ्या श्लोकाच्या पहिल्या तीन चरणांत विशेष अर्थ सांगून त्याच्या प्रतिपादनार्थ चतुर्थ चरणांत सामान्य अर्थाचें कथन केलें आहे; म्हणजे एथेंहि **अर्थांतरन्यास** अलंकार झाला.

## ३५.मिथ्याध्यवसिति

दुर्घट अशा अर्थाच्या सिध्यर्थ मिथ्याभूत अर्थाची कल्पना केली असते, तेथें **मिथ्याध्यवसिति** होते. जसें " पाटीभर मीठ खाईल तो मूर्खाची समजूत

पाडील." ह्या वाक्यांत मूर्खाची समजूत पाडणें हें कार्य दुर्घट आहे; त्याच्याच दुर्घटपणाच्या सिद्धीकरितां पाटीभर मीठ खाणें ह्या मिथ्याभूत अर्थाची कल्पना केली आहे, म्हणून एथें **मिथ्याध्यवसिति** अलंकार झाला.

### ३६.ललित

वर्णनीय जो प्रकृत अर्थ त्याचें वर्णन न करितां त्याचा प्रतिबिंबरूप जो अप्रकृत अर्थ त्याचें वर्णन करणें, ह्यास **ललितालंकार** म्हणतात. जसें; " पाणी निघून गेल्यावर हा पूल बांधण्यास इच्छितो."

ह्या उदाहरणांत योग्य समयीं उद्योग न करितां तो मग करणें ह्या प्रकृत वर्णनीय अर्थाचें वर्णन न करितां त्याच्या प्रतिबिंबभूत जो 'पाणी निघून गेल्यावर पूल बांधणें' हा अर्थ ह्याचेंच वर्णन केलें, म्हणून हा **ललितालंकार** झाला.

### ३७.प्रहर्षण

यत्न केल्यावांचून कार्य सिद्ध होणें, इच्छिलेल्या अर्थापेक्षां अधिक अर्थाचा लाभ होणें, इत्यादिक वर्णन ज्या स्थलीं केलें असतें तेथें **प्रहर्षणालंकार** होतो. जसें;

**आर्या : जानकीपरिणयनाटक ( स्वकृत. )**

**होतें मनिं दावावा, खेळ करोनी सभेस हो ज्याचा ॥**
**दैवें तद्विषयिंच हा, नियोग होतो मला समाजाचा ॥ १ ॥**

ह्या उदाहरणांत इच्छित अर्थाची सिद्धि यत्नावांचून झाली असें वर्णिलें म्हणून एथें **प्रहर्षणालंकार** झाला.

" देवाजवळ मागितला एक डोळा तर देवानें दिले दोन डोळे." ह्या वाक्यांत इच्छिलेल्या अर्थापेक्षां अधिक अर्थाची प्राप्ति वर्णिली आहे.

### ३८.विषादन

इच्छिलेल्या अर्थाच्या विरुद्ध अर्थाची प्राप्ति वर्णिली असतां **विषादन** अलंकार होतो. जसें; इच्छा करी पुत्राची, तों हानी झाली भर्त्याची !" ह्या वाक्यांत पुत्ररूप अर्थ इष्ट असून तद्विरुद्ध जो भर्तृनाशरूप अर्थ त्याची प्राप्ति वर्णिली आहे म्हणून **विषादन** झालें.

### ३९.अनुगुण

पूर्वींचाच असणारा जो गुण, त्याचा दुसऱ्याच्या योगानें उत्कर्ष वर्णिला असतां **अनुगुणालंकार** होतो. जसें

**अभंग**

**आधीं बाळ मूर्ख साचें, त्यांत लाड वडीलाचे,**
**वरी खेळायाची हौस, त्यांत आला फाल्गुन मास ॥**

ह्या उदाहरणांत मुलाच्या मूर्खपणाचा उत्कर्ष इतराच्या योगानें वर्णिला आहे.

## ४०.लेश

गुणाचें दोषत्वेंकरून किंवा दोषाचें गुणत्वेंकरून कल्पिणें तेथें **लेशनामा अलंकार** होतो.

**उदाहरण : श्लोक कृ. शा. चि. कृत**

**तुझी वाणी कोणी म्हणति गुण हा अद्‌भुत असे,**
**मला वाटे मोठा तुजजवळि हा दोषचि असे ॥**
**शुका तीच्या योगें सतत पिंजऱ्यामाजि पडशी,**
**गड्या स्वातंत्र्याचीं अनुपम सुखें सर्व मुकशी ॥ १ ॥**

ह्या श्लोकांत पोपटाच्या अंगीं मनुष्यवाणीरूप जो अनुपम गुण तो दोषत्वें-करून वर्णिला आहे.

## ४१.प्रतिषेध

जेथें प्रसिद्ध निषेधाचाच अनुवाद केला असतो, तेथें **प्रतिषेधालंकार** होतो.

**आर्या मोरोपंती ( विराटपर्व )**

**पार्थ म्हणे रे कर्णा, बहुभट मजशीं भिडोन गडबडती ॥**
**ही आजि आजि आहे, नोहे केली सभेंत बडबड ती ॥ १ ॥**

एथें जी सभेंतील बडबड वास्तविक नव्हती तिलाच ही बडबड नव्हे असें म्हणून निषेध केला आहे.

## ४२.विधि

सिद्ध गोष्टीचेंच विधान करणें तेथें **विधिनामा अलंकार** होतो. जसें; "अहो, जें घोडें तें घोडें आणि गाढव तें गाढव. त्यांची बरोबरी कशी होईल ?" ह्या वाक्यांत घोडें आणि गाढव हीं सिद्धच असतां त्यांचेंच विधान केलें आहे.

## ४३.स्वभावोक्ति

जात्यादिकांचे ठायीं राहाणारा स्वभाव जेथें वर्णिला असतो तेथें **स्वभावोक्ति** होते. जसें;

**श्लोक : र. पं. कृत**

**टाकी उपानह पदें अतिमंद ठेवी,**
**केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥**
**हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं,**
**भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥ १ ॥**
**कलकलकल हंसें फार केला सुटाया,**
**फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया ॥**
**नृपतिस मणिबंधीं टोंचिता होय चंचू,**
**धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ॥ २ ॥**

एथें पहिल्या श्लोकांत जोडे काढून ठेवणें, विजार वरती करणें, हातांतलीं कडीं मागें सारणें, मौन धरणें, इत्यादिक **नळाची** स्थिति वर्णिली आहे; तशी पक्ष्यादिकांना हळूच युक्तीनें धरण्याचे प्रसंगीं मनुष्याची स्थिति होत असते ती यथास्थित कथिली आहे; व दुसऱ्या श्लोकांत पक्ष्याला धरिलें असतां तो कलकल शब्द करितो, पंख फडफडितो, मणगटाला वगैरे चोंचीनें टोंचितो, आणि उडून जायाला पाहातो, ही त्याची स्थिति वर्णिली आहे, म्हणून एथें **स्वभावोक्ति** अलंकार झाला.

हे मुख्य मुख्य अलंकार एथें सांगितले. ह्यांशिवाय संस्कृत ग्रंथकारांनीं बहुत अलंकार सांगून शेवटीं **रसवान् प्रेय** इत्यादि चार, **भावोदयादि** तीन, **प्रत्यक्ष अनुमान** इत्यादि **प्रमाणालंकार** आठ, मिळून पंधरा; व अलंकारांचें परस्पर मेलन होऊन त्यांचा भेद जसा स्पष्ट किंवा अस्पष्ट दिसत असेल तदनुसार **संसृष्टि** व **संकर** ह्या नांवेंकरून दुसरेहि नानाविध अलंकार वर्णिले आहेत, त्यांचें विवेचन करण्यास ह्या संक्षिप्त ग्रंथांत अवकाश नाहीं.

---

# प्रकरण सातवें

## छंद

**प्रश्न.**—**छंद** म्हणजे काय ?

**उत्तर.**—पद्याच्या ज्या निरनिराळ्या जाती, त्यांस **छंद** असें म्हणतात.

**प्रश्न.**—**छंदां**च्या जाति कशावरून ओळखतां येतात ?

**उत्तर.**—**मात्रां**च्या संख्येवरून अथवा अक्षरांच्या **गणांवरून** त्या ओळखतां येतात.

**प्रश्न.**—**मात्रा** कशा मोजितात ?

**उत्तर.**—**लघु** अक्षराची मात्रा एक, व **गुरु** अक्षराच्या मात्रा दोन. जसें : **रमा** ह्या शब्दांत **र** ह्याची मात्रा एक व **मा** ह्या अक्षराच्या मात्रा दोन.

**प्रश्न.**—**लघु** व **गुरु** अक्षर कसें समजावें ?

**उत्तर.**—जितकीं ऱ्हस्व अक्षरें तितकीं **लघु**. जसें अ, इ, उ, क, कि, कु, इत्यादिक. आणि दीर्घ, विसर्गयुक्त, अनुस्वारयुक्त, पुढें जोडाक्षर असतां मागील ऱ्हस्व अशीं जीं अक्षरें तीं सारीं **गुरु** होत. जसें : आ, ई, का, की, कू, के, कै, को, कौ, हीं दीर्घ; दुःख ( यांत विसर्गयुक्त **दुः** ), **गंगा** यांत ( अनुस्वारयुक्त **गं** ) **सत्ता** यांत ( पुढें जोडाक्षर आहे म्हणून **स** ), हीं अक्षरें **गुरु** आहेत. तसेंच पादांतीचें अक्षर लघु असून पाहिजे असल्यास तें गुरु समजावें[1]; तसाच **छ** ह्या अक्षरामागील वर्ण लघु असल्यास तोहि गुरु जाणावा; परंतु प्राकृतांत जोडाक्षरांचा उच्चार जोरानें होत नाहीं तेथें त्याच्या मागील लघु अक्षर गुरु होत नाहीं. जसें : **पिढ्या, विड्या, जुड्या, नद्या** इत्यादि. ज्या सानुस्वार अक्षराचा उच्चार नाकांत होतो तेंहि अक्षर लघूचें लघुच राहातें. जसें जँव, तँव, इत्यादि.

लघु अक्षराला **ल** व गुरु अक्षराला **ग** असें म्हणण्याची छंदशास्त्रांत परिभाषा आहे. लघु अक्षर दाखवायास ( । ) अशी सरळ रेषा व गुरु अक्षर दाखवायास ( ऽ ) अशी वक्र रेषा लिहितात. प्रस्तार करण्याचे कामांत

---

१. हा नियम वसंततिलकादि वृत्तांसच लागू आहे; इतरांस नव्हे, म्हणजे वसंततिलकादि वृत्तांहून अन्य वृत्तांच्या द्वितीय व चतुर्थ पादांविषयींच हा लागू पडतो असें जाणावें.

ह्याच चिन्हांचा उपयोग करितात. कोणी लघु अक्षराचे माथ्यावर ( ˘ ) असें व गुरु अक्षराचे माथ्यावर ( — ) असें चिन्ह करितात.

**प्रश्न.**–अक्षरांचे गण कसे व ते किती आहेत?

**उत्तर.**–तीन अक्षरांचा एक गण होतो. असे गण आठ आहेत. तीं अक्षरें सर्व गुरु, सर्व लघु किंवा लघु व गुरु हीं मिश्रित असतात, त्या गणांचीं नांवें **म, य, र, त, न, भ, ज, स.** यांत लघु गुरु अक्षरें खालीं लिहिल्याप्रमाणें असतात;

| गणाचें रूप | गणाचें नांव | मात्रा संख्या | गणाचें रूप | गणाचें नांव | मात्रा संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ { ग ग ग / ऽ ऽ ऽ } सर्व गुरु | **म** | ६ | ५ { ल ल ल / । । । } सर्व लघु | **न** | ३ |
| २ { ल ग ग / । ऽ ऽ } आद्य लघु | **य** | ५ | ६ { ग ल ल / ऽ । । } आद्य गुरु | **भ** | ४ |
| ३ { ग ल ग / ऽ । ऽ } मध्य लघु | **र** | ५ | ७ { ल ग ल / । ऽ । } मध्य गुरु | **ज** | ४ |
| ४ { ग ग ल / ऽ ऽ । } अंत्य लघु | **त** | ५ | ८ { ल ल ग / । । ऽ } अंत्य गुरु | **स** | ४ |

**प्रश्न.**–आतां मात्रागण कसे व ते किती आहेत तें सांगावें.

**उत्तर.**–प्रत्येक मात्रागण चारचार मात्रांचा असतो. मात्रागण एकंदर पांच आहेत ते असे :—

| गणाचें रूप | नांव | मात्रा संख्या | गणाचें रूप | नांव | मात्रा संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ { ग ग / ऽ ऽ } द्विगुरु किंवा सर्वगुरु | **म** | ४ | ४ { ल ल ग / । । ऽ } अंत्य गुरु | **स** | ४ |
| २ { ग ल ल / ऽ । । } आद्य गुरु | **भ** | ४ | ५ { ल ल ल ल / । । । । } चतुर्लघु किंवा सर्वलघु | **न** | ४ |
| ३ { ल ग ल / । ऽ । } मध्य गुरु | **ज** | ४ | | | |

## अक्षर छंदांचें कोष्टक

| छंदांचीं नांवें | प्रत्येक चरणांतील अक्षरांची संख्या | प्रत्येक छंदांतील मुख्य मुख्य वृत्तांचीं नांवें व संख्या | प्रत्येक छंदांतील एकंदर सर्व वृत्तांची संख्या |
|---|---|---|---|
| १. उक्ता | १ | श्री १ | २ |
| २. अत्युक्ता | २ | स्त्री, मधु २ | ४ |
| ३. मध्या | ३ | नारी, मृगी २ | ८ |
| ४. प्रतिष्ठा | ४ | कन्या, कुमारिका २ | १६ |
| ५. सुप्रतिष्ठा | ५ | पंक्ति १ | ३२ |
| ६. गायत्री | ६ | तनुमध्या, इत्यादि ११ | ६४ |
| ७. उष्णिक् | ७ | कुमारललिता, मधुमतो इत्यादि ९ | १२८ |
| ८. अनुष्टुप् | ८ | प्रमाणिका, विद्युन्माला, माणवक इ. १३ | २५६ |
| ९. बृहती | ९ | रत्नकरा इत्यादि ८ | ५१२ |
| १०. पंक्ति | १० | चंपकमाला, विराट, इत्यादि १० | १०२४ |
| ११. त्रिष्टुभ् | ११ | दोधक, शालिनी, इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, स्वागता, रथोद्धता इत्यादि २४ | २०४८ |
| १२. जगती | १२ | चंद्रवर्त्म, वंशस्थ, इंद्रवंशा, तोटक, द्रुतविलंबित, भुजंगप्रयात इत्यादि ३० | ४०९६ |

| छंदांचीं नांवें | प्रत्येक चरणांतील अक्षरांची संख्या | प्रत्येक छंदांतील मुख्य मुख्य वृत्तांचीं नांवें व संख्या | प्रत्येक छंदांतील एकंदर सर्व वृत्ताची संख्या |
|---|---|---|---|
| १३. अतिजगती | १३ | प्रहर्षिणी, मत्तमयूर इत्यादि १४ | ८१९२ |
| १४. शक्करी | १४ | वसंततिलक इत्यादि १२ | १६३८४ |
| १५. अतिशक्करी | १५ | मालिनी इत्यादि १८ | ३२७६८ |
| १६. अष्टि | १६ | पंचचामर इत्यादि ६ | ६५५३६ |
| १७. अत्यष्टि | १७ | शिखरिणि, पृथ्वी, हरिणी, मंदाक्रांता इत्यादि १२ | १३१०७२ |
| १८. धृति | १८ | नाराच इत्यादि ९ | २६२१४४ |
| १९. अतिधृति | १९ | शार्दूलविक्रीडित इत्यादि ६ | ५२४२८८ |
| २०. कृति | २० | सुवदना इत्यादि ६ | १०४८५७६ |
| २१. प्रकृति | २१ | स्त्रग्धरा इत्यादि ३ | २०९७१५२ |
| २२. आकृति | २२ | मदिरा इत्यादि ३ | ४१९४३०४ |
| २३. विकृति | २३ | ललित इत्यादि ९ | ८३८८६०८ |
| २४. सत्कृति | २४ | किरीट इत्यादि ७ | १६७७७२१६ |
| २५. अभिकृति | २५ | क्रौंचपदा इत्यादि ८ | ३३५५४४३२ |
| २६. उत्कृति | २६ | विलास इत्यादि ५ | ६७११८८६४ |

**प्रश्न**.—अक्षरछंदांची संख्या व नांवें सांगावीं.

**उत्तर.—अक्षरछंद** एकंदर सव्वीस आहेत.

त्या छंदांचीं **नांवें**, प्रत्येक छंदाच्या चरणांतील अक्षरांची **संख्या** व दर एक छंदांतील कांहीं **प्रसिद्ध वृत्तांचीं नांवें** आणि सर्व **प्रसिद्ध वृत्तांचीं** संख्या, व शेवटीं त्या छंदांतील गुरुलघूंच्या स्थानभेदानें प्रस्ताराअन्वयें उत्पन्न होणाऱ्या सर्व **रूपभेदांचीं ( वृत्तांचीं )** संख्या, ह्यांचें **कोष्टक.**

**प्रश्न.**—आतां प्राकृतांत येणारीं मुख्य मुख्य वृत्तें, त्यांचीं लक्षणें व गण ह्यांसहित सांगावीं.

**उत्तर.**—मुख्यमुख्य वृत्तांचीं लक्षणें, गण, नामें ह्यांसहित त्यांचीं उदाहरणें पुढें सांगतों. वृत्तांचे उदाहरणार्थ जो श्लोक किंवा श्लोकार्ध अथवा श्लोकपाद लिहिला आहे, तो त्याच वृत्ताचा असून त्यांतच त्या वृत्ताचे गण व त्याचे नाम आणि स्थलविशेषीं यति हीं सांगितलीं आहेत. **म, य, र** इत्यादि गणांचीं नामें आहेत, तथापि वृत्ताच्या अनुरोधानें **मा, या, रा** अशा प्रकारें त्यांचीं रूपें बदललीं आहेत, तेथें ते **म, य, र** इत्यादिकच आहेत, असें समजावें.

---

## १. अनुष्टुप्छंद : चरणांत अक्षरें ८ : वृत्तसंख्या : २५६

### १. विद्युन्माला

**आठा गांचा मेळा आला,**
**त्याला विद्युन्माला बोला ।।**

### २. माणवका

**भातलगा तुम्ही अणा,**
**माणवका त्यास म्हणा ।।**

### ३. प्रमाणिका

**जरालगा तुम्ही लिखा,**
**तिला म्हणा प्रमाणिका ।।**

---

## २. पंक्तिछंद : चरणांत अक्षरें १० : वृत्तसंख्या : १०२४

१.चंपकमाला

भामसगा या वर्णगणाला,
बोलती लोकीं चंपकमाला ।।

---

## ३. त्रिष्टुप्छंद : चरणांत अक्षरें ११ : वृत्तसंख्या : २०४८

१.शालिनी

मातातागा वर्णपंक्तीस पाहे
लोकांमाजी शालिनी नाम आहे ।।

२.दोधक

तीन भ दोन ग वर्णगणा या
दोधकवृत्त असें म्हणती या ।।

३.इंद्रवज्रा

ताता जगीं गा परमेश्वरातें
तें इंद्रवज्राभिध वृत्त होतें ।।

४.उपेंद्रवज्रा

ज ता ज गा गा लिहितां क्रमानें
उपेंद्रवज्राख्यचि वृत्त जाणें ।।

५.रथोद्धता

रा न रा ल ग गणास आणिता
वृत्त होय मग तें रथोद्धता ।।

६.स्वागता

रा न मा ग ग गणास लिहावें,
स्वागता बुधि तयास म्हणावें ।।

७.कनकमंजरी

न र र या तिघां मांडुनी गणा
लघु गुरु क्रमें वर्ण ही अणा ।।

ऋतु[१]+शरींच[१] विश्रांति मानितां
कनकमंजरी येतसे हतां ॥ ७ ॥

४. जगतीछंद : चरणांत अक्षरें १२ : वृत्तसंख्या : ४०९६

१.वैश्वदेवी

मा मा या या ह्या वर्णवर्गा लिहावें
त्या वृत्ताला हो वैश्वदेवी म्हणावें ॥

२.तोटक

सगण स्फुट चार लिहिशिल रे
तरि तोटकवृत्तचि होय खरें ॥

३.भुजंगप्रयात

विचारूनि चौघां यकारांस आणा
भुजंगप्रयाताख्य तें वृत्त जाणा ॥

४.द्रुतविलंबित

नभसरा गण हे लिहिले जरीं
द्रुतविलंबित होत असे तरी ॥

५.वंशस्थ

जताजरा हे गण ज्यांत शोभती
कवींद्र वंशस्थ तयास बोलती ॥

६.इंद्रवंशा

ताता जरा हे गण आणितां खरे
तें इंद्रवंशाख्यचि वृत्त जाणरे ॥

५. अतिजगतीछंद : चरणांत अक्षरें १३ : वृत्तसंख्या : ८१९२

१.प्रहर्षिणी

जेथें बा मनरजग क्रमेंचि येती
जाणावी त्रिदशयति[२] प्रहर्षिणी ती ॥

१. सहाव्या व तेथून पांचव्या अक्षरावर विराम.
२. तीन व दहा या अक्षरांवर विराम.

## ६. शक्करीछंद : चरणांत अक्षरें १४ : वृत्तसंख्या : १६३८४

### १.वसंततिलका

**ताभाजजागग** असा क्रम जैं गणास
तेव्हां **वसंततिलका** म्हणती तयास ॥

## ७. अतिशक्वरीछंद : चरणांत अक्षरें १५ : वृत्तसंख्या : ३२७६८

### १.मालिनी

**नन मययगणांची** पंक्ति जे एक पाहे
वसु[1] मुनिविरती त्या **मालिनी** नांव आहे ॥

## ८. अष्टिछंद : चरणांत अक्षरें १६ : वृत्तसंख्या : ६५५३६

### १.पंचचामर

**लघू गुरू लघू गुरू** अशाच षोडशाक्षरा
क्रमें लिहोनिया म्हणा तयास **पंचचामरा** ॥

## ९. अत्यष्टिछंद : चरणांत अक्षरें १७ : वृत्तसंख्या : १३१०७२.

### १.हरिणी

**नसमरसलागा** हे ऐसे गणस्फुट दीसती
रिपु[2] जलधिसाती विश्रांती तदा **हरिणीच** ती ॥

### २.शिखरिणी

**यमानासाभालागगण** जरि हे येति चरणीं
विराम स्पष्टत्वें रि[3]पुशिवमितीं ते **शिखरिणी** ॥

### ३.पृथ्वी

**जसाजसयलाग** हे गण अनुक्रमें दीसती
अठीं नवि विराम ये तरि घडेल **पृथ्वीच** ती ॥

---

१. आठ व सात अक्षरांवर विराम. २. सहा, चार व सात या अक्षरांवर विराम. ३. सहा व अकरा या अक्षरांवर विराम.

४.मंदाक्रांता

मामानातातगग गण हे पंक्तिनें जाण येतां
मंदाक्रांता श्रुतिरिपु[1] मुनी एथ विश्रांति घेतां ॥

---

अतिधृतिछंद : चरणांत अक्षरें १९ : वृत्तसंख्या : ५२४२८८.

१.शार्दूलविक्रीडित.

मासा जासततागा हे गण रवीसातीं[2] असो हो यती
ऐसा हा क्रम जाणिजे बुधवरीं शार्दूलविक्रीडितीं ॥

---

प्रकृतिछंद : चरणांत अक्षरें २१ : वृत्तसंख्या : २०९७१५२

१.स्त्रग्धरा

माराभानाय या या गणसमुदय हा पंक्तिनें येइ जेथें
सातां सातां वरी हो विरति जरि असे स्त्रग्धरा जाण तेथें ॥

---

आकृतिछंद : चरणांत अक्षरें २२ : वृत्तसंख्या : ४१९४३०४

१.ललितमारारिका ( अश्वधाटी ).

व्हावी जरीं ललितमारारिका तगण
मांडीं अर्धीं बुधवरा ।
भातें लिहीं मग तुं यातें तसेंचि जग-
णातें हि जोड चतुरा ॥
सातें लिहोनि मग रातें अणीं तगण
योजीं तदुत्तरबरा ।
पाहोनि वर्ण गुरु घालीं तरीच तव
इष्टार्थ जाय शिखरा ॥ १ ॥

---

१. चार, सहा व सात या अक्षरांवर विराम. २. बारा व सात या अक्षरांवर विराम.

२.सवाई

**सात भ लेहुनिया मग एक गुरू जरि अक्षर योजियलें**
**ह्यारितीनें बनतें शुभवृत्त तयासचि नांव सवाइ दिलें ॥**
**"तो दशकंठ अकुंठ विसां भुजिं तें विषकंठ धनू उचली"**
**हेचि उदाहृति वामनपंडितभाषित यास्थलिं जाण भली ॥ १ ॥**

---

**प्रश्न.**–आतां **मात्रा** छंदाचे प्रकार सांगावे.
**उत्तर.–मात्रा** छंदांत आर्या, साकी, दिंडी, इत्यादिक वृत्तें आहेत. त्यांतून मुख्यमुख्य वृत्तांचीं लक्षणें व उदाहरणें सांगतों.

## आर्यावृत्ताचे मुख्य प्रकार ५

### त्यांचें कोष्टक[1]

| | प्र० च० मात्रा. | द्वि० च० मात्रा. | तृ० च० मात्रा. | च० च० मात्रा. |
|---|---|---|---|---|
| १. आर्या : | १२ | १८ | १२ | १५ |
| २. गीति : | १२ | १८ | १२ | १८ |
| ३. उपगीति : | १२ | १५ | १२ | १५ |
| ४. उद्गीति : | १२ | १५ | १२ | १८ |
| ५. आर्यागीति : | १२ | २० | १२ | २० |

## उदाहरणें

### १.आर्या : भा. दा. पा.

**नूतन पल्लव फुटला, असला तरु आणिला प्रियेनें तो ॥**
**लवकर चाखायाला, तोंडाशीं गज पहा नेतो ॥**

---

१. **टीप**. आर्या छंदांत **भ, ज, स, म, न,** हे पांचच गण येतात. प्रत्येक गणाच्या मात्रा चार चार धरितात; म्हणून **भ ज स** हे तीन गण अक्षर-छंदांतीलच यांत येतात. परंतु **म** गण हा दोन गुरु अक्षरांचा व **न** गण हा चार लघु अक्षरांचा या छंदांत धरितात, हा विशेष आहे. आर्या छंदांतील प्रत्येक अर्धांत सात गण असून शेवटीं एक गुरु अक्षर येतें. व यांत विषम म्हणजे प्रथम, तिसरा, पांचवा व सातवा या गणस्थानीं **ज** गण नसावा; व सहावे गणस्थानीं **ज** गण किंवा **न** गण ( चार लघु अक्षरें ) या दोहोंपैकींच एक असावा असा नियम आहे. हा नियम ज्या आर्या छंदाच्या प्रकारांत षष्ठ-स्थानीं गणाच्या ठिकाणीं एक लघु अक्षरच येतें त्यास व आर्यागीति यास लागू पडत नाहीं.

## २.गीति : मोरोपंती

**नारायण नामानें, नच्च सोडावें कदापि हें वदन ।।**
**मेल्याही लोभ्याच्या, चित्तीं सोडूं नये जसें सदन ।।१।।**

## ३.उपगीति : भा० दा० पा०

हें सर्व अंग फुललें, कुमुद जसें चंद्रकिरणांनीं ।।
फुलतें काय कधीं तें, सांग बरें सूर्यकिरणांनीं ।।१।।

## ४.उद्गीति

**नारायणनामानें, नचि सोडावें कधीं वदन ।।**
**मेल्याही लोभ्याच्या, चित्तीं सोडूं नये जसें सदन ।।१।।**

## ५.आर्या गीति

मंगलसुतिलक अलिकीं,
कुमुदाक्षी भरि सुरम्य कज्जल अलि कीं
चंद्रमुखी ते हरिला,
रुचिली श्रीकांत योगिपति परि हरिला ।।१।।

---

## साकी

**साकीची** अर्धें दोन, प्रत्येक अर्धांत मात्रा अठ्ठावीस असतात. जसें;

**विश्वामित्रें प्रावृट्काळें करुणामेघश्याम ।।**
**गौतमजायामरुभूमीप्रति आणियला अभिराम ।।**

---

## दिंडी

ह्या वृत्ताला चरण दोन किंवा चार असतात, प्रत्येक चरणांत मात्रा एकुणवीस.

### दोन चरणी

**कथा बोलूं हे मधुर सुधाधारा ।।**
**होय श्रृंगारा करुणरसा थारा ।।१।।**

### चार चरणी

**चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू**
**नळा ऐसा तरि कळानिधी वानूं ।।**

प्रतापाचा जो न मालवे भानू,
तया सारीखा कोण दुजा मानूं ॥१॥

---

## अभंग व ओवी

**अभंग व ओवी** हीं वृत्तें कांहीं अंशीं अनियमित आहेत, तथापि तीं प्राकृत कवितेंत फार येतात, यास्तव मासल्याकरितां त्यांचीं उदाहरणें सांगतों.

**अभंग प्रकार १ : चार चरणी**

**देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी ॥ तेणें मुक्ती चारी साधीयेल्या ॥ १ ॥**

**अभंग प्रकार २ : चार चरणी : तुकाराम.**

**आपुलीया बळें नाही बोलवत ॥ सखा कृपावंत वाचा त्याची ॥ १ ॥**

**अभंग प्रकार ३ : दोन चरणी**

**पुढें आतां कैचा जन्म ॥ ऐसा श्रम वारेसा ॥१॥**

**अभंग प्रकार ४ : दोन चरणी**

**करी मस्तक ठेंगणा ॥ लागे संताच्या चरणा ॥१॥**

---

**ओवी मुक्तेश्वरी**

**अचल संपत्ती अरोगकाया ॥ सुगुण पुत्र पवित्र जाया ॥**
**बहुतजन्में हरिहरांच्या पायां ॥ पूजितां हें फळ पाविजे ॥१॥**

यांखेरीज **घनाक्षरी, पदें, भूपाळ्या, आरत्या, लावण्या,** इत्यादिक प्राकृत-छंदें बहुत आहेत, तीं एथें विस्तरभयास्तव सांगत नाहीं.

**प्रश्न.**—सम इत्यादिक वृत्तांचे प्रकार कसे तें सांगावें.

**उत्तर.**—ज्या वृत्ताचे चारहि पाद समान तें **समवृत्त,** ज्या वृत्ताचीं दोनहि अर्धें समान तें **अर्धसमवृत्त,** आणि ज्या वृत्ताचे चारहि पाद परस्परें असमान तें **विषमवृत्त** होय, ह्याप्रमाणें तीन प्रकार आहेत[1].

---

१. याखेरीज दुसरीं वृत्तें आहेत, पण तीं विस्तरभयास्तव लिहिलीं नाहींत.

# प्रकरण आठवें

## दोष

**प्रश्न.–दोष** म्हणजे काय व ते किती प्रकारचे आहेत ?

**उत्तर.–रसाचा** अपकर्ष करणारे जे धर्म ते दोष होत. ते **पददोष, वाक्यदोष, अर्थदोष** इत्यादि अनेक प्रकारचे आहेत.

**प्रश्न.–पददोषांचीं** नांवें व लक्षणें सांगावीं.

**उत्तर.**–त्यांतून मुख्य मुख्य **दोषांचीं** नांवें व लक्षणें पुढें सांगतों.

१. **श्रुतिकटुत्व :** ( कर्णकठोरत्व ) जें पद ऐकायास किंवा उच्चारायास कठिण किंवा अवघड लागतें, त्या पदाचा प्रयोग केला असतां हा (श्रुतिकटुत्व) दोष होतो. जसें; "**कार्तार्थ्य**" ( कृतार्थता ), "**धाष्टर्च**" ( धृष्टता ), इत्यादिक.

२. **संस्कारहीनत्व :** ज्या पदास व्याकरणाच्या नियमांप्रमाणें संस्कार झाला नसतो, त्या पदांचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें;

"**मत्कांतामुखइंदु पाहुनि कलंकी इंदु हा लाजतो.**"

ह्या उदाहरणांत "**मत्कांतामुखइंदु**" हें समासांत एक पद आहे म्हणून तद्धटक जीं "**मत्कांतामुख**" व "**इंदु**" हीं पदें यांचा संधिरूप संस्कार झालाच पाहिजे; तो येथें नाहीं.

३. **अप्रयुक्तत्व :** प्रसिद्ध कवींनीं ज्याचा प्रयोग केला नाहीं त्या पदाचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें; "**सरोवरीं पहा कसा प्रफुल्ल पद्म शोभतो.**" एथें '**पद्म**' पदाचा प्रयोग पुल्लिंगांत केला आहे; तो वस्तुतः शुद्ध असतांहि तसा प्रसिद्ध कवींचा प्रयोग नाहीं.[1]

४. **ग्राम्यत्व :** जें पद केवळ हलक्या लोकांच्या बोलण्यांत फार येतें आणि काव्यांत उपयोग करण्याजोगें प्रौढ नसतें, त्या पदाचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें; श्लोकार्ध ( द्रुतविलंबित ) "**लइ** कठोर म्हणे धनु

---

१. हें उदाहरण संस्कृतास लागू आहे. आतां **सबब, जरूर** इत्यादि ज्या शब्दांचा प्रयोग जुन्या प्रतिष्ठित प्राकृत कवींनीं केलेला आढळत नाहीं म्हणून त्यांचा प्रयोग केला तर हा दोष होईल असें जाणावें.

जानकी, । निपट कासवपृष्ठसमान कीं ।। " ह्या उदाहरणांत **लइ** हें पद कोळी-वगैरे हलक्या लोकांच्याच बोलण्यांत येतें. म्हणून येथें हा ग्राम्यत्वदोष झाला. **लइ** ह्याच्या ठिकाणीं **बहु** असा पाठ असणें योग्य, व या श्लोकाचा मूळ कवि जो **वामनपंडित** त्याचा तसाच पाठ आहे, तो निर्दोष आहे.

५. **अश्लीलत्व :** जें पद **लज्जाकारक**, **अमंगल** किंवा **घाणेरडा** अशा अर्थाचें वाचक असतें, त्याचा प्रयोग आला असतां हा दोष होतो. क्रमानें उदाहरणें :—

**अभंग**

**" भले तरी देऊं गांडीची लंगोटी ।।**
**नाठाळाचे काठी माथां देऊं " ।। १ ।।**

**तुकाराम.**

**आर्या**

**"क्रोधें चवताळुनि तो धांवे घेऊनि तीक्ष्ण खड्ग करीं" ।।**
**"बोले क्षत्र न भी जरि रिपुवनिता आजि बोडक्या न करी" ।।१।।**
**चतुरंग सैन्य तुडवुनि रक्ताचे वाहवी महापूर ।।**
**तें घोर कृत्य देखुनि नर ढरढर हागती जरी शूर ।। २ ।।**

वरील उदाहरणांतील "**गांडीची**" "**बोडक्या**" व "**ढरढर हागती**" हीं पदें क्रमानें **लज्जाकारक**, **अमंगल** व **घाणेरडा** अशा अर्थाचीं वाचक आहेत, म्हणून येथें **अश्लीलत्व** हा दोष येतो.

६. **अनुचितार्थत्व :** ज्याच्या अर्थ अनुचित, अशा पदाचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें; "**देवत्वा पावती शूर पशुभूत रणाध्वरीं.**" ह्यांतील **पशु** हें पद भितरेपणाचें व्यंजक आहे म्हणून **अनुचितार्थ** होय.

७. **संदिग्धत्व :** ज्याच्या अर्थाविषयीं संशय उत्पन्न होतो त्या पदाच्या प्रयोगीं हा दोष होतो. जसें; "**थोर महीभृत्कटकीं जाया भय वाटतें जना फार.**" ह्यांत "**महीभृत्कटकीं**" म्हणजे राजाच्या सैन्यांत किंवा पर्वताच्या नितंबप्रदेशीं याचा निर्णय होत नाहीं.

८. **क्लिष्टत्व :** ज्याचा अर्थ परंपरासंबंधानें असल्यामुळें समजण्यास क्लेश पडतो, त्या पदाचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें;

**श्लोक**

**अलिकुलवहनाचें वहन आणीत होतें,**
**शशिधरवहनानें ताडिलें मार्गपंथें ॥**
**नदिपतिरिपु ज्याचा तात भंगोनि गेला,**
**रविसुत महिसंगें फार दुःखीत झाला[१] ॥ १ ॥**

एथें अलिकुल म्हणजे भ्रमरसमुदाय, त्याचें वहन म्हणजे कमल, त्याचें वहन म्हणजे उदक, तें आणीत असतां मार्गीं शशिधर म्हणजे शिव त्याच्या वहनानें म्हणजे बैलानें ताडिलें तेव्हां नदिपति म्हणजे समुद्र त्याचा रिपु म्हणजे अगस्तिऋषि त्याचा तात म्हणजे कुंभ ( घागर ) फुटला, आणि रविसुत म्हणजे कर्ण व कर्ण म्हणजे कान तो फार दुखावला. असा हा अर्थ परंपरेनें बसविण्यास क्लेश पडतो, म्हणून हीं पदें क्लिष्ट होत.

९. **विरुद्धमतिकृत्व :** विरुद्ध अर्थाची प्रतीति करणाऱ्या पदाचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें; " **अकार्य मित्र तूं माझा** " ह्यांत कार्य म्हणजे प्रयोजन त्यावांचूनहि तूं माझा मित्र आहेस असा अर्थ विवक्षित असून " अकार्याविषयीं मित्र " अशा विरुद्ध अर्थाची प्रतीति होते. अथवा " **भवानी-पती सर्वदा चिंतिजावा.** " एथें **भवाची** जी स्त्री ती **भवानी**, तिचा पति म्हणजे आणखी कोणी असावा अशी विरुद्ध प्रतीति उत्पन्न होते.

१०. **असमर्थत्व :** केवळ योगार्थ धरूनच पदाचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. जसें; " **जलधरवसनाच[२] बायको तुज राजा मज कां तशी नको** " ह्या उदाहरणांत जलधर हें पद समूद्राविषयीं रूढ नसताहि योगार्थावरूनच त्याविषयीं योजिलें म्हणून **असमर्थत्व** होय.

११. **नेयार्थत्व :** ज्याचा अर्थ स्वसंकेतानेंच क्लृप्त, अशा पदाच्या प्रयोगीं हा दोष होतो. जसें; " **व्यत्यस्तनववृत्ती हे झाले राजा रिपू तुझे** " ह्या उदाहरणांत व्यत्यस्त म्हणजे उलटें असें जें '**नव**' हें पद म्हणजे ' वन 'तदृत्ति म्हणजे तेथें वास करणारे असा कविसंकेतानेंच अर्थ क्लृप्त आहे म्हणून ' व्यत्यस्तनव ' हें पद नेयार्थ होय.

---

१. या श्लोकांत प्रथमपादांत एक अक्षर अधिक व द्वितीयपादांत 'मार्गपंथे' या पदांत अर्थाची पुनरुक्ति असे आणखीहि दोष आहेत.

२. पृथ्वी ( समुद्रवसना ) हा दोष संस्कृतालाच विशेषें लागू आहे.

१२. **निरर्थकत्व :** जेव्हां पद केवळ पादपूरणाकरितांच योजिलें असतें तेव्हां हा दोष होतो. जसें; अनुष्टुप् श्लोकार्ध "**प्रभातवेळा झाली हे, सोड माना हि मानिनी**" एथील द्वितीय पादांत '**हि**' हें पद केवळ पादपूरणार्थच घातलें आहे.

१३. **अविमृष्टविधेयांशत्व :** जेव्हां पदांतील विधेय अंशास गौणता आली असते, तेव्हां हा दोष होतो. हा दोष समासांत पदांतच असतो असें जाणावें. जसें; "**सुभ्रु हा तव कटाक्षचि साचा, षष्ठ बाण जणुं पंचशराचा.**" ह्या उदाहरणांत विधेयत्वेंकरून षष्ठत्व हें विवक्षित आहे. परंतु **षष्ठ** हें पद बाण ह्या पदाशीं समास पावलें आहे म्हणून त्याचें विधेयत्व गौण झालें. अथवा जसें; "**द्वितीय मौर्वी जणुं कार्मुकाची**" ह्यांतहि द्वितीयत्वाला विधेयता विवक्षित असून समासामुळें गौणत्व पावली. **मौर्वी द्वितीया जणुं कार्मुकाची**" असा पाठ चांगला.

ह्याप्रमाणेंच **निहतार्थत्व** म्हणजे उभयार्थक पदाचा अप्रसिद्ध अर्थी प्रयोग करणें, **अवाचकत्व** म्हणजे ज्या अर्थाचें जें पद वाचक नाहीं त्या अर्थी त्याचा प्रयोग करणें, इत्यादि आणखीहि अनेक पददोष आहेत; परंतु ते येथें विस्तरभयास्तव सांगितले नाहींत[१].

---

## वाक्यदोष

**प्रतिकूलवर्णत्व, हतवृत्तत्व** इत्यादि वाक्यदोष आहेत. त्यांतून कितीएकांचीं लक्षणें व उदाहरणें पुढें सांगतों.

१. **प्रतिकूलवर्णत्व :** रसाला प्रतिकूल असे वर्ण वाक्यांत असले म्हणजे तेथें हा दोष होतो. जसें; आर्यार्ध. "**अत्युत्कटउत्कंठा तुजविषयीं कंबुकंठि मज झाली.**" ह्या वाक्यांत **शृंगाररस** वर्ण्य असून त्यास प्रतिकूळ वर्ण जो ठकार तो वारंवार आला.

२. **हतवृत्तत्व :** रसाला प्रतिकूल असें वृत्त असलें म्हणजे हा दोष होतो. जसें; "**उत्कटउत्कंठा : कलकंठी मिठी घालण्याची तव कंठीं.**" **हें वृत्त** हास्यरसाचें व्यंजक असून प्रकृत जो **शृंगार** रस त्याला **प्रतिकूल** आहे.

---

१. यांतील कांहीं पददोष विशेषेंकरून संस्कृताला लागू आहेत.

**३. न्यूनपदत्व** : वाक्यांतील पदांचा अन्वय लावतांना एखादें पद उणें असतें तेव्हां हा दोष होतो. जसें;

**श्लोक**

**जरी[१] माझ्यावरी आतां कृपादृष्टि समर्पिली ॥**
**तरी माहेंद्रपदवी न वाटेल मला भली ॥ १ ॥**

या वाक्यांतील पदांचा अन्वय लावण्यास "त्वां" हें कर्तृपद उक्त असल्या-मुळें उणें आहे.

**४. अनभिहितवाच्यत्व** : जेव्हां एखादें पद वाक्यांत अवश्य वक्तव्य असून उक्त नसतें तेव्हां हा दोष होतो. जसें—

**आर्यार्ध**

**"अपराध अल्प नसतां मजवरि तूं सुंदरी कशी रुसशी"**

ह्या वाक्यांत "अल्प" ह्या शब्दापुढें 'ही' हें पद अवश्य उक्त असावें तें नाहीं. आणखी उदाहरण—

**श्लोक**

**गंगे तुझें वंदिल तोय माते ।**
**स्वप्नीं न पाहे नर तो यमातें ॥**
**स्नानें तुझ्या मुक्ति सकाय होते ।**
**पानें कळेना मग काय होतें ॥ १ ॥**

ह्या श्लोकांत स्वप्नीं ह्याच्या पुढें 'ही' हा शब्द अवश्य पाहिजे तो नाहीं.

**५. अधिकपदत्व** : वाक्यांत अधिक पद असतें तेव्हां हा दोष होतो. जसें— उ० "**शशधराकृति सुंदर वक्त्र हें**" येथें "**आकृति**" हें पद अधिक आहे.

**६. कथितपदत्व** : वाक्यांत एखादें पद उक्त असून पुनः येतें तेव्हां हा दोष होतो. यासच **पुनरुक्तपदत्व** असेंहि म्हणतात. जसें—"**रतिलीला श्रमातें हा सलील हरितो मरुत्**" येथें **लीला** पदाची पुनरुक्ति आहे.

**७. समाप्तपुनरात्तत्व** : जेव्हां अन्वय समाप्त झाल्यावर पुढें विशेषण दिलें असतें तेव्हां हा दोष होतो. जसें—"**स्वरा ऐकोनि भुललों तुच्छकोकिल-**

---

१. या श्लोकांत "माहेंद्रपदवी" या पदापुढें "ही" हें पद अवश्य वक्तव्य असून उक्त नाहीं म्हणून येथें पुढील अनभिहित वाच्यत्व हाहि दोष आहे.

**निस्वना**[१] " एथें भुललों एणेंकरून अन्वय समाप्त झाला असतां, तुच्छ इत्यादि विशेषण दिलें.

८. **अर्धांतरैकपदत्व :** पद्याच्या एक्या अर्थांतील अन्वयसंबंधीं एकच पद दुसऱ्या अर्धांत उक्त असतें तेव्हां हा दोष होतो. जसें–

**अनुष्टुप् श्लोक**

**त्रैलोक्याधीश्वरा तूतें नमस्कार असो बरें ॥**
**माझा, कृपा करीं दीन बहु मी जाण बा खरें ॥**

ह्या **पद्याच्या** पूर्वार्धांतील अन्वयापैकीं '**माझा**' हें एकच पद उत्तरार्धांत सांगितलें आहे.

९. **प्रसिद्धिहतत्व** : प्रसिद्धीचा त्याग असतां हा दोष होतो. जसें; "**आराव हा घोर पयोधरांचा.**" एथें मेघांच्या शब्दास **आराव** असें म्हटलें; परंतु तशी प्रसिद्धि नाहीं. कां कीं, मेघांच्या शब्दास **गर्जित**, वस्त्रांच्या व मंजीरादि भूषणांच्या शब्दास **सिंजित**, पक्ष्यांच्या शब्दास **कूजित** असें म्हणण्याची **कवि-प्रसिद्धि** आहे.

१०. **भग्नप्रक्रमत्व** : ज्या क्रमानें आरंभ केला असतो तो क्रम सुटला असतां हा दोष होतो. जसें;

**श्लोक**

**" गुहाग्रहें बांधव ते किरात**
**पुरीहि विंध्य क्षिति ते समस्त ॥**
**नद्याचि वापी अजि जाहल्या खऱ्या,**
**दशा रिपुंच्या तव नाहिं रे बऱ्या !"**

एथें गुहाग्रहें असा बहुवचनांत शब्दानें आरंभ करून मध्यें पुरी हा शब्द एकवचनांत घातला म्हणून एथें प्रक्रमाचा भंग झाला. असेंच लिंग, विभक्ति, प्रकृति, प्रत्यय, इत्यादिकांविषयीं **प्रक्रमभंग** होतो असें जाणावें.

११. **अक्रम** : पदार्थांचा अनुक्रम सुटला असतां हा दोष होतो. जसें;

**श्लोकार्ध**

**" कीर्तिप्रताप यामध्यें लोपले सूर्यचंद्रही."**

---

१. तुच्छ आहे कोकिलाचा शब्द जिनें अशी.



एथें कीर्ति व प्रताप यांच्या अनुक्रमानें " **चंद्रसूर्यहि** " असें पाहिजे होतें तें उलटें पडलें.

१२. **संकीर्णत्व** : एके वाक्यांत दुसऱ्या वाक्याचीं पदें निश्चित झालीं असतां हा दोष होतो. **आर्यार्ध. जसें—**

**" धम्मिल्लाची कोणा शोभा वाटे न हर्ष पाहुनियां "**

एथें धम्मिल्लाची शोभा पाहुनियां कोणा हर्ष न वाटे ? या वाक्यांचीं पदें परस्पर मिसळलीं आहेत. अथवा,

**श्लोकार्ध**

**" सोड चंद्रा प्रिये आतां पाहें रोषा नभस्थलीं "**

एथें "प्रिये आतां नभस्थलीं चंद्रा पाहें" व "रोषा सोड" या दोन वाक्यांतील पदें परस्परांत मिसळलीं आहेत.

१३. **गर्भितत्व** : एक वाक्य आरंभून मध्येंच दुसरें एक वाक्य सांगून मग पहिलें वाक्य समाप्त होतें तेथें हा दोष होतो. जसें;

**आर्यार्ध**

**" धम्मिल्लाची, कोणा वाटेना हर्ष, पाहुनी शोभा ?" ॥**

एथें **धम्मिल्लाची शोभा पाहुनी कोणा हर्ष न वाटे ?** अशीं दोन वाक्यें आहेत त्यांतून " **धम्मिल्लाची** " इतकाच वाक्यांश सांगून मध्येंच " **कोणा वाटेना हर्ष** " हें वाक्य संपूर्ण घालून " **पाहुनी शोभा** " हा पूर्व वाक्यशेष सांगितला.

१४. **अभवन्मतसंबंधत्व** : जेव्हां वाक्यांतील संबंध इष्ट पदांशीं होत नाहीं तेव्हां हा दोष होतो. जसें;

**ओंव्या**

**सिंहासनें गिरिपाषाण ॥ वृक्ष तेचि छत्रें जाण ॥**
**दुर्दशाराज्यस्थित पूर्ण ॥ शत्रुगण स्वामी तुझा ॥ १ ॥**

एथें '**गिरि**' या पदाचा संबंध '**पाषाण**' या पदाशीं मात्र समासामुळें होतो. वृक्ष या पदाशीं असणें इष्ट असून होत नाहीं: अथवा,

**ओंव्या**

**जी कां जयश्री मदनाची ॥ अलंकारचि जी या जगाची ॥**
**जी कांता मम प्राणची ॥ भेटी तिची होईल कीं ? ॥ १ ॥**

एथें जी या संबंधीं सर्वनामाच्या निकट कांता हें पद उक्त आहे म्हणून त्याचा संबंध सर्वत्र होणें इष्ट असून होत नाहीं. " भेटी त्या कांतेची होईल कीं ? " असें " त्या " या सर्वनामाजवळ " कांतेची " ह्या पदाची उक्ति असल्यास त्याचा संबंध सर्वत्र होतो.

१५. **अस्थानस्थितपदत्व** : एखादें पद अयोग्य स्थानीं उक्त असतां हा दोष होतो. जसें–

## आर्यार्ध

**" सर्वां स्त्रियांत अससी सौंदर्यानिंचि तूं प्रिये अधिक " ।।**

एथें " चि " हें अवधारणार्थक " तूं " या पदापुढें असावें तें **" सौंदर्यानें "** याच्यापुढें अयोग्य स्थानीं पडलें.

१६. **अमतपरार्थत्व** : प्रकृत अर्थाच्या विरुद्ध असा दुसरा अर्थ होत असतां हा दोष होतो.

## उदाहरण–श्लोक

**रामकामशरताडित झाली, राक्षसी तिस न कोणिहि वाली ।।**
**रक्तचंदनरसें तंव न्हाली, जीवितेशवसतीप्रति गेली ।। १ ।।**

एथें **बीभत्सरस** प्रकृत असून तद्विरुद्ध जो श्रृंगार त्याचा व्यंजक दुसरा अर्थ आहे.

१७. **छंदोभंग** व **यतिविच्छेद** : छंदाचा भंग व यति ( विरामस्थल ) याचा विच्छेद झाला असतां अनुक्रमानें **छंदोभंग** व **यतिविच्छेद** हे दोष होतात. जसें–( छंदोभंगाचें उदाहरण. )

## अनुष्टुप् श्लोक

**परमेश्वरा जो भजतो ।। तो सदा सुख पावतो ।।**
**म्हणोनि त्याला भजिजे ।। हाचि सन्मार्ग जाणिजे ।। १ ।।**

हा श्लोक अनुष्टुपछंदांत असून ह्याच्या प्रथमचरणांत नऊ[1] अक्षरें आहेत तीं आठ असलीं पाहिजेत. म्हणून येथें छंदोभंग[2] झाला.

---

१. अधिकपदत्व दोष असतां पदांच्या अन्वयकालींच बाध ध्यानांत येतो. व अपुष्टत्व असतां पदान्वय झाल्यानंतर बाधाचें भान होतें इतका विशेष आहे. २. छंदोभंग म्हणजे छंदाच्या लक्षणानुसार पद्य नसणें, याप्रमाणेंच वृत्ताच्या लक्षणानुसार पद्य नसलें म्हणजे वृत्तभंग दोष जाणावा.

## उदाहरण यतिविच्छेदाचें श्लोक

**अन्याय माझा जरि थोर नारा। यणा मला दे स्वपदींच थारा॥**
**माझा नमस्कार असो तुला वा। मना दयासिंधु सदैव देवा॥**

ह्या श्लोकांतील पूर्वार्धांतीं यति म्हणजे विरामस्थान हें **नारायणा** या पदाच्या मध्येंच म्हणजे 'नारा' याच्या पुढें आलें, व उत्तरार्धांत तें **वामना** या पदाचा अंश जो 'वा' त्याच्यापुढें आलें म्हणून येथें यतिविच्छेद[1] हा दोष झाला. कारण यति म्हणजे विरामस्थान तें पदाच्या अंतीं म्हणजे पद संपल्यावर असावें. पदाच्या मध्यें म्हणजे पद संपण्याच्या पूर्वीं असूं नये असा नियम आहे. यतिविच्छेदामुळें पद्यास अश्राव्यता येतें.

ह्याप्रमाणें हे वाक्यदोष सांगितले, यांतून कित्येक विशेषेंकरून संस्कृतास लागू आहेत तरीं संस्कृतपदघटित वाक्यें प्राकृत कवितेंतहि आढळतात म्हणून ते येथें सांगितले.

## अर्थदोष

१. **अपुष्टत्व :** मुख्यार्थाला अनुपयोगी जो अर्थ तो वर्णिला असतां हा दोष होतो. जसें;

### आर्यार्ध

**पाहुनि सखि विस्तीर्णीं आकाशीं इंदुतें त्यजी रोषा॥**

एथें '**विस्तीर्ण**' पदाचा अर्थ रोषत्यागरूप अर्थाच्या पुष्टीविषयीं अगदीं उपयोगी नाहीं.

२. **क्लिष्टत्व :** जो अर्थ लौकर बुध्द्यारूढ होत नाहीं तो वर्णिला असतां हा दोष होतो. जसें;

### आर्यार्ध

**सीमांतचि लब्ध आम्हां कांतासीमंतचिंतनें झाला!॥**

---

१. शिखरिणी, पृथ्वी इत्यादि वृत्तांत यति म्हणजे विरामस्थानें सांगितलीं आहेत. तीं स्थानें पदाच्यामध्यें म्हणजे पदाचा कांहीं अंश विरामस्थानाच्या पूर्वीं येऊन कांहीं त्याच्यापुढें राहणें असें झाल्यास यतिविच्छेद दोष होतो; म्हणून यति पदाच्या अंतीं येणें चांगलें या नियमासहि स्वरसंधीचा वगैरे अपवाद आहे तो येथें विस्तरभयास्तव लिहीत नाहीं.

एथें कांतेच्या केशवेशाच्या चिंतनांतच आमचा **सीमांत** (आयुरंत) झाला. आतां कांतेच्या ध्यानावारींच आयुष्य गेलें, परंतु तिची प्राप्ति झाली नाहीं व परमार्थहि साधला नाहीं; तस्मात् आमचें जिणें व्यर्थ! हा अर्थ लौकर बुध्द्यारूढ होत नाहीं म्हणून क्लिष्ट होय.

३. **व्याहतत्व :** पहिल्यानें एक अर्थ सांगून पुढें त्याच्याच विरूद्ध अर्थाचें प्रतिपादन करणें. जसें;

**श्लोक**

**जया न लागती गोड वस्तु इंदुकलादिका ॥**
**पाहूनि ते तुष्ट होती ही प्रिया नेत्रचंद्रिका ॥ १ ॥**

एथें ज्यांना इंदुकला आवडत नाहींत असें प्रथम सांगून त्यांनाच आनंद करण्याकरितां प्रियेच्या ठायीं चंद्रिकेचा आरोप केला.

४. **पुनरुक्तत्व :** एकदा सांगितलेला अर्थ पुनश्च सांगणें. जसें;

**साकी**

**मूर्छित बाळा पाहुनि तन्मन शतधा फुटोनि गेलें ॥**
**शिशू अचेतन विलोकूनियां हृदयविदारित झालें ॥ १ ॥**

एथें पूर्वार्धांत जो अर्थ उक्त आहे तोच पुनश्च उत्तरार्धांत सांगितला.

५. **दुष्क्रमत्व :** योग्यतादिकांचा क्रम सुटला असतां हा दोष होतो. जसें;

**श्लोकार्ध**

**दे राजा अश्व मजला किंवा हत्तीच थोरला ॥**

एथें अश्वापेक्षां हत्ती उत्कृष्ट आहे म्हणून पहिल्यानें तोच मागणें योग्य होतें.

६. **संदिग्धत्व :** अर्थाचा निर्णय बरोबर होत नाहीं तेथें हा दोष होतो. जसें;

**श्लोकपाद**

**करिकुंभ स्तन जिंकिताति अजि हे जे क्षामता पावले ॥**

एथें **करिकुंभ** व **स्तन** यांतून **कर्तृपद** कोणतें व **कर्मपद** कोणतें याचा निर्णय बरोबर होत नाहीं. अथवा,

**श्लोकार्ध**

**सेवूं नितंबा प्रति भूधरांच्या, किंवा स्मरस्मेरविलासिनींच्या ॥**

ह्या पदांतील वक्ता **शांत** किंवा **शृंगारी** आहे. ह्याचा निर्णय प्रकरणावरून व्हावयाचा, तो प्रकरण नसल्यामुळें होत नाहीं.

७. **प्रसिद्धिविरुद्धत्व :** प्रसिद्धीच्या विरुद्ध अर्थ सांगणें. जसें;

**श्लोकपाद**

**त्रिशूल घेवोनि रमेश धांवला ।।**

एथें, **रमेश** म्हणजे **विष्णु** यांचें **त्रिशूलधारण** प्रसिद्ध नसतां वर्णिलें.

८. **विद्याविरुद्धत्व** : विद्या म्हणजे शास्त्र त्यास विरुद्ध असणें. जसें;

**श्लोकपाद**

**रात्रौ स्नाना करोनी प्रतिदिनिं करितो सर्वशास्त्रार्थचिंता ।।**

एथें रात्रौ स्नान सांगितलें तें धर्मशास्त्रविरुद्ध होय. कविप्रसिद्धविरुद्धत्वाचें उदाहरण. जसें;

**श्लोकपाद**

**पादाघातें अशोका त्वरित युवतिच्या अंकुरोत्पत्ति झाली ।।**

तरुण स्त्रीच्या पादाघातानें अशोक वृक्षाला फुलें येतात अशी **कविप्रसिद्धि** असून अंकुरोत्पत्ति झाली म्हणून येथें सांगितलें, तें कविप्रसिद्धिविरुद्ध होय. आतां,

**श्लोकार्ध**

**नृपति कीर्ति तुझी बहु पांढरी, त्रिभुवनीं फिरते न मळे तरी ।।**

एथें कीर्तीचा वर्ण पांढरा वर्णिला तो लोकविरुद्ध आहे तरी **कविप्रसिद्धि** तशी आहे म्हणून हा दोष नव्हे.

ह्याप्रमाणें हा **प्रसिद्धिविरुद्धत्व** दोष अन्यशास्त्रांविषयींहि जाणावा.

९. **अनियमनियमत्व** : नियम किंवा अवधारण नको तेथें तें करणें. जसें;

**श्लोकार्ध**

**मुख विलोकुनि इंदुचि लाजतो,**
**म्हणवितो जरिगे उडुराज तो ।।**

एथें **इंदूच** लाजतो असा नियम केला तो बरोबर नाहीं. अथवा,

**आर्या**

**आवर्तचि नाभि तुझा, नेत्रें पद्में, वली तरंग तसे ।।**
**यावरुनि वाटतें मज, कीं तूं लावण्यतोयवापि असे ।। १ ।।**

एथें "**आवर्तचि**" असा नियम केला तो बरोबर नाहीं.

१०. **नियमानियमत्व** : नियम करणें योग्य असून तो न करणें. जसें;

**आर्या**

**जे विषय भोगसमयीं गोड तयांमधिं निमग्न जो झाला ॥**
**तो नर काय करिल हा, नाहीं विश्वास येत चित्ताला ॥ १ ॥**

एथें भोगसमयीं मात्र गोड असा नियम करणें योग्य असून तो केला नाहीं.

११. **अविशेषविशेषत्व** : सामान्यरूपानें सांगणें योग्य असून सामान्य-रूपानेंच सांगणें. जसें;

**श्लोकार्ध**

**सीते विस्तीर्ण पाहें हा हीरकाकर सागर ॥**

एथें 'रत्नाकर' असें सामान्यरूपानें सांगणें योग्य होतें. परंतु तें हीरकाकर अशा विशेषरूपानें सांगितलें.

१२. **विशेषाविशेषत्व** : विशेषरूपानें सांगणें योग्य असून सामान्यरूपानेंच सांगणें. जसें;

**श्लोकपाद ( शार्दूलविक्रीडित )**

**काळी चंद्रकळाचि नेसुनि फिरे रात्रीं सदा जारिणी ॥**

एथें रात्रीं असें सामान्यरूपानें सांगितलें तें **काळोख्या रात्रीं** असें विशेष-रूपानें असावें.

१३. **साकांक्षत्व** : उक्तार्थास आणखी अर्थाची अपेक्षा असणें. जसें;

**श्लोक**

**भंग ईशधनुष्याचा, क्षत्रियांची समुन्नती ॥**
**स्त्रीरत्न, यांतें साहेल कैसा लंकापुरीपती ? ॥ १ ॥**

एथें "**साहेल**" या क्रियेशीं अन्वय होण्यास "**धनुर्भंग**" "**क्षत्रियसमुन्नती**" हीं योग्य आहेत, तर तसें "**स्त्रीरत्न**" हें योग्य नाहीं; तर "**स्त्रीरत्नोपेक्षण**" असें असणें योग्य म्हणून उपेक्षणरूप अर्थाची अपेक्षा आहे.

१४. **सहचरभिन्नत्व** : विजातीय पदार्थाची भेसळ करणें ती अशी कीं, बहुत चांगले पदार्थ सांगून त्यांबरोबर एखादा वाईट पदार्थ सांगणें, किंवा याचें उलटें, म्हणजे वाईट पदार्थ बहुत सांगून त्यांबरोबर एखादा चांगला पदार्थ सांगणें. जसें—

**आर्या**

**दारिद्र्य सज्जनाला, तैसें कांताकुचां अधःपतन ।।**

**खलसत्कार सभेमधिं ह्या गोष्टींनीं दुखावती सुमन[1] ।। १ ।।**

**सज्जन** व **कांता** हे पदार्थ शोभन असून त्यांच्या बरोबर अशोभन जो खल त्याचीहि गोष्ट सांगितली. अथवा

**आर्या**

**ज्ञानें बुद्धि नराची, व्यसनें मूर्खत्व ही, मदें नारी, ।।**

**उदकें नदी, विधूनें निशा, नयें नृपति शोभतो भारी ।। १ ।।**

एथें "ज्ञानें बुद्धि" इत्यादिक श्रेष्ठ व मान्य अशा पदार्थांबरोबर" व्यसनें मूर्खत्व" हा नीच व अमान्य असा पदार्थ वर्णिला.

**१५. अपार्थत्व** : एकंदर वाक्यसमूहाचा अर्थ जुळत नसणें. जसें;

**श्लोक**

**ही तो शुष्कजला वापी, अग्नि काष्ठांस जाळितो ।**

**शैत्य फार गमे आतां, देव सर्वांस पाळितो ।। १ ।।**

एथें एकंदर वाक्याचा अर्थ परस्परांशीं जुळत नाहीं.

**१६. परुषत्व** : अयोग्य रीतीचा कठोरपणा वर्णिला असतां हा दोष होतो. जसें;

**आर्या**

**द्वाड बहुत पोरें हीं जाळा यांची करोनियां होळी ! ।।**

**कां कीं, दिधलीं परि तीं पुनरपि येवोनि मागती केळीं ।। १ ।।**

एथें, मुलें केळीं मागतात येवढ्याच कारणानें त्यांस अति कठोर बोलणें हें वर्णन अयोग्य होय.

**१७. अश्लीलत्व** : किळस, लज्जा इत्यादि करणारा अर्थ वर्णिला असतां हा दोष होतो. जसें;

**अभंग**

**कावळे प्रीतीनें खाताती शेंबूड ।।**

**विष्ठा वाटे गोड डूकरांशी ।। १ ।।**

---

१. चांगलें मन ज्यांचें ते.

ह्या उदाहरणांतील अर्थ घाणेरडा व किळस येण्याजोगा आहे.

**१८. प्रकाशितविरुद्धत्व :** विवक्षित जो अर्थ त्याच्या विरुद्ध अशा अर्थाची प्रतीति होणें. उदाहरण;

## श्लोकार्ध

**तुझा पुत्र नराधीशश्रीतें पावो अतां त्वरें ॥**

एथें "हे नराधीश, तुझा पुत्र आतां लौकर श्रीतें पावो" असा अर्थ विवक्षित असतां 'तुझा पुत्र नराधीशश्रीतें लौकर पावो.' म्हणजे राज्यपदारूढ लौकर होवो, म्हणजे 'राजा, तूं आतां सत्वर मरण पाव' अशा विरुद्ध अर्थाची प्रतीति होते.

"**मी खोटें बोलणार नाहीं बोललों तर पाप लागेल.**" ह्या वाक्यांत 'मी खोटें बोललों तर पाप लागेल' असा विरुद्ध अर्थ विवक्षित असून 'नाहीं बोललों तर पाप लागेल' अशा विरुद्ध अर्थाची प्रतीति होते.

ह्याप्रमाणेंच **त्यक्तपुन:स्वीकृतत्व** म्हणजे अर्थ समाप्त झाला असतां पुनः स्वीकृत करणें; **ग्राम्यत्व** म्हणजे अर्थ ग्राम्य असणें; **निर्हेतुत्व** म्हणजे हेतु सांगणें उचित असून तो न सांगणें; इत्यादि आणखीहि अर्थदोष आहेत असें जाणावें.

---

## रसदोष

रसाचा **रस** या शब्दानें किंवा **शृंगार, वीर** इत्यादिक जे रसभेदवाचक शब्द त्यांहींकरून उल्लेख केला असतां दोष होय. जसें;

**त्या एणाक्षीस पाहोनी रस झाला विलक्षण ॥**
**चंद्रबिंबा विलोकूनी श्रृंगारीं रमलें मन ॥ १ ॥**

एथें पूर्व उदाहरणांत **रस** या पदानें व दुसऱ्या उदाहरणांत **शृंगार** या पदानें रसाचा उल्लेख केला आहे.

**स्थायीभाव** व **व्यभिचारीभाव** यांचेहि, '**स्थायी**' व '**व्यभिचारी**' या पदांनीं, किंवा तत्प्रभेद जे **रति, हास,** इत्यादिक व **निर्वेद, ग्लानि,** इत्यादिक ह्या शब्दांनीं उल्लेख करणें दोष होय. जसें;

## श्लोकार्ध

**१. कांता पाहोनि राजाला रति उत्पन्न जाहली ॥**
**२. झाली लज्जावती बाला प्रियानें चुंबितां तिला ॥**

एथें प्रथम उदाहरणांत **रति** या पदानें **स्थायीभावाचा**, व दुसऱ्या उदाहरणांत **लज्जा** या पदानें **व्यभिचारीभावाचा**, उल्लेख केला आहे. आतां या दुसऱ्या उदाहरणांत '**झाली मुकुलिताक्षी ती प्रियानें चुंबितां प्रिया**' असा लज्जेचा अनुभाव नेत्र मिटणें याच्याद्वारें लज्जा व्यंजित केली असावी हें उचित होय.

**प्रकृत रसाच्या** विरुद्ध जो रस त्याच्या अंगाचें वर्णन करणें हें दोषरूप होय. जसें;

### आर्यार्ध

**यौवन अस्थिर जाणुनि रोषातें सुंदरी कधीं न धरी ॥**

एथें यौवनाच्या अस्थैर्याचें वर्णन केलें तें शृंगार रसाचा विरोधी जो शांत रस त्याचें अंग होय म्हणून तें योग्य नाहीं.

असेंच प्रकृत रसाचा उत्कर्ष असतां मध्येंच त्याचा उच्छेद करणें; प्रकृत रसाच्या अनुपयोगी ज्या गोष्टी त्या सांगणें; प्रकृत प्रधानरस असेल त्याचें अनुसंधान सोडणें; अंगाचाच फार विस्तार करणें; हेंहि उचित नव्हे.

तसेंच कोणी **नायक** इत्यादिक **दिव्य** असतात; कोणी **अदिव्य** असतात; व कोणी **दिव्यादिव्य** ( उभयमिश्रित ) असतात; त्यांचेहि **धीरोदात्तादिक** व **उत्तमाधमादिक**, भेद आहेत; म्हणून जो **नायक** किंवा दुसरा कोणी **वर्ण्य** असेल तो जसा व ज्या प्रकारचा असेल, तद्नुरूपच त्याचीं **कर्मे** व **चरितें** वर्णावीं. **देव** असला तर देवास शोभेल असें, व **मनुष्य** असला तर मनुष्यास शोभेल असें, वर्णन करावें. **देवाला** अतिशयित भीति व अतिशयित शोक हीं शोभत नाहींत. व मनुष्याला स्वर्गपातालादि लोकांतरगमन, समुद्रोल्लंघन, हीं **अमानुष कर्मे** असंभाव्य होत म्हणून, व **पार्वती परमेश्वरासारखीं** जीं उत्तम दैवतें, त्यांचीं संभोगशृंगारवर्णनें हें मातापित्यांच्या संभोगशृंगार वर्णिल्याप्रमाणें अयोग्य होय म्हणून तशीं वर्णनें करूं नयेत. आणि जें ज्यास शोभत नाहीं, तसें त्याचें वर्णन केलें असतां तें विपरित होतें, म्हणून त्यास **प्रकृतिविपर्यय** असें म्हणतात.

असेंच **देशकाल** इत्यादिकांचेंहि अन्यथा वर्णन केलें असतां तेंहि अनुचित होय, आणि असें अनुचित वर्णन केल्यानें काव्य **असभ्य** होऊन त्याविषयीं लोकांची अश्रद्धा होते; म्हणून वर्णन करणें तें सर्वत्र **उचितपणास** अनुसरूनच

करावें; म्हणजे तें काव्य **सभ्य व मान्य** असें होतें.

---

## अलंकारदोष

**उपमा** अलंकारांत उपमान **नीच** असतां **हीनोपमत्व,** उपमान **अधिक** असतां **अधिकोपमत्व**, साधारण धर्म एक नसल्यानें उपमान अतुल्य असतां **अतुल्योपमत्व**, व उपमान **अप्रसिद्ध** किंवा **प्रसिद्धिविरुद्ध** असतां **अप्रसिद्धोपमत्व** हे दोष होतात[१]. त्यांचीं अनुक्रमानें उदाहरणें :

### आर्या

**१. हरिणातें शुनक तसे, त्वत्सेनावीर शत्रुतें वधिती ॥**

**२. बक हे सरसीतीरीं, निश्चल बसले जसे मुनीश पहा ॥**
**यातें व्यर्थचि दिधलें, आम्हीं बहुविध असह्य दुःख अहा! ॥**

### श्लोक

**३. हा विंध्याद्रि दिसे मातें सांद्रकुंजाच्छनिर्झर[२] ॥**
**भालस्थेक्षणवन्हीनें[३] युक्त जैसा उमावर ॥**

**४. कांतांचीं वदनें प्रसन्न कुमुदां ऐसीं बहू शोभती,**

एथें, पहिल्या उदाहरणांत वीरांना कुत्र्यांची उपमा दिली ती **नीच** होय. दुसऱ्या उदाहरणांत बगळ्यांना मुनींची उपमा दिली ती **अधिक** होय. तिसऱ्या उदाहरणांत विंध्याचलाला शिवाची उपमा दिली ती उभयतांचा सामान्य धर्म एक नसल्यानें अतुल्य होय. चौथ्या उदाहरणांत मुखांला कुमुदांची उपमा दिलीं ती कविप्रसिद्धी **विरुद्ध** होय.

## दुसरीं उदाहरणें

### आर्यार्ध : ( रूपकालंकाराविषयीं )

**१. विततार्थरश्मि[४] ऐसा रचितों मी काव्यचंद्रमा[५] सुभग.**

### श्लोकार्ध ( उपमालंकारविषयीं. )

**१. " प्रज्वलज्जलधारासे वर्षती शर वीर हे. "**

**२. " रणीं निर्दय राजा हा चांडाळापरि मारितो " ॥**

---

१. ह्या अलंकार दोषांचा अंतर्भाव पूर्वोक्त वाक्यादि दोषांमध्येंच होतो; तथापि त्याचें स्पष्ट ज्ञान होण्याकरितां पृथकत्वें करून कथन केलें आहे. २. निबिडलतागृह स्वच्छ निर्झर ज्याच्याठायीं. ३. भालगत नेत्राग्नीनें युक्त. ४. विस्तीर्ण अर्थरूप किरण ज्याचें असा. ५. काव्यरूप चंद्र.

३. " **कर्पूरशकला ऐसें शोभतें चंद्रबिंब हें** " ॥
४. " **नीलकंठपणें मोर हरापरि विराजतो.** "
५. " **पयोधर तुझे कांते शोभती पर्वतापरी.** "

एथील पहिल्या उदाहरणांतील **रूपक** व बाकीच्या सर्व उदाहरणांतील **उपमा** अयोग्य आहेत असें जाणावें.

**उपमेमध्यें** साधारण धर्माचा न्यून्याधिक भाव असतां क्रमानें **न्यूनपदत्व** व **अधिकपदत्व** हे दोष होतात. तसेंच उपमान व उपमेय यांचें लिंग व वचन यांचा, आणि काळ, पुरुष व विधि इत्यादिकांचा भेद असला तर **भग्न-प्रक्रमत्वरूप** दोष होतो.

उत्प्रेक्षा अलंकारांत " जसा " हा शब्द उत्प्रेक्षावाचकत्वेंकरून घातला असतां **अवाचकत्वरूप** दोष होतो. जसें;

**श्लोकार्ध**

**हा मूर्तिमान् जसा धर्म भूपती रक्षितो क्षिती.** ॥

एथें '**जसा**' ह्याच्या ठिकाणीं '**जणूं**' हा शब्द असावा.

**समासोक्ति** नामक अलंकारांत उभय साधारण विशेषणाच्याच योगानें **अप्रस्तुतार्थाची** प्रतीति होते, व **अप्रस्तुत प्रशंसालंकारांत** व्यंजनेच्या योगानेंच प्रस्तुतार्थाची प्रतीति होते, म्हणून पुनश्च ती शब्दांनीं उक्त केली असतां **पुनरुक्तिनामा** दोष होतो.

**अचेतनाला** सचेतनाप्रमाणें कल्पून त्याशीं भाषण करणें हेंहि दोषावहच आहे असें समजावें.

**अनुप्रासनामक** शब्दालंकारांत **प्रसिद्धिविरुद्धताख्य** दोष येत असतां तो आणूं नये, आणिल्यास तो दोष होईल हें उघडच आहे.

**यमकनामक** शब्दालंकारांत तीनच चरणांत **यमक** असून चतुर्थ चरणांत तें नसल्यास **अप्रयुक्तत्वरूप** दोष होतो.

**जो आणि तो ह्या संबंधीसर्वनाम शब्दांविषयीं :**

'**जो**' आणि '**तो**' ह्या दोन सर्वनाम शब्दांचा नित्य संबंध आहे, म्हणजे '**जो**' हें सर्वनाम आलें म्हणजे '**तो**' हें सर्वनाम आलेंच पाहिजे, किंवा '**तो**' हें सर्वनाम आलें म्हणजे '**जो**' हें सर्वनाम आलेंच पाहिजे, अन्यथा दोष होतो असा नियम आहे.

परंतु, जेथें एकवेळ गोष्ट सांगण्यास आरंभ होऊन पदार्थ उक्त झाला आहे, किंवा जो पदार्थ प्रसिद्ध आहे, किंवा ज्या पदार्थाचा मनाला अनुभव असून तो सांगणें आहे, अशा तीन कारणांनीं '**तो**' हा शब्द आला असतां त्याला '**जो**' हा शब्द सांगण्याची अपेक्षा नाहीं, म्हणून तो नाहीं सांगितला तरी चालतें. क्रमानें उदाहरणें :

१. "**परमेश्वर सर्व जगाचा बाप आहे, तो सर्वांचें संरक्षण करितो.**" ह्या वाक्यांत **परमेश्वर** हा पदार्थ एक पूर्वीं उक्त झाला म्हणून '**तो**' हा शब्द आला ह्यास्तव '**जो**' हा शब्द सांगण्याचें अगत्य नाहीं.

२. "**काय चिंता आहे? तो परमेश्वर तुला पाहून घेईल?**"
ह्या वाक्यांत **तो** म्हणजे **प्रसिद्ध** असा अर्थ आहे, म्हणून '**जो**' हा शब्द सांगण्याची गरज नाहीं.

३. "**अहाहा ! त्या महासंकटांतून देवानें मला तारिलें बरें !**" ह्या वाक्यांत त्या म्हणजे **अनुभविलेल्या** असा अर्थ आहे म्हणून येथें '**जें**' हें सांगण्याची गरज नाहीं.

उत्तरवाक्यांत '**जो**' हा शब्द आला, तर पूर्ववाक्यांत '**तो**' हा शब्द न आला तरी दोष नाहीं. जसें;

**श्लोकार्ध**

**नमन करितसें मी देवदेवा हरीतें**
**भवभय अवघेंही नाम ज्याचें हरीतें ॥**

ह्या उदाहरणांत '**ज्याचें**' हा शब्द उत्तरवाक्यांत आला आहे म्हणून पूर्ववाक्यांत '**तो**' ह्या शब्दाची आवश्यकता नाहीं.

उत्तरवाक्यांत '**तो**' हा शब्द आला असल्यास पूर्ववाक्यांत '**जो**' हा शब्द सांगितला तरी दोष नाहीं.

परंतु, पूर्ववाक्यांत '**जो**' हा शब्द आला असेल तर उत्तरवाक्यांत '**तो**' हा शब्द अवश्य सांगितला पाहिजे. नाहीं तर दोष आहे. जसें;

"**जो सर्व जगाचा कर्ता, परमेश्वराला आम्ही शरण आहों.**"

एथें उत्तरवाक्यांत '**त्या**' हा शब्द अवश्य पाहिजे. हेंच वाक्य "**परमेश्वराला** आम्ही शरण आहों, **जो** सर्व जगाचा कर्ता आहे" असें उलटें म्हटलें तर मग पूर्ववाक्यांत '**त्या**' हा शब्द सांगण्याची आवश्यकता नाहीं.

**अवतंस**, **कुंडल**, हे शब्द कर्णसंबंधीं भूषणांचे वाचक असतांहि **कर्णावतंस**, **श्रवणकुंडलें** असे प्रयोग येतात. जसें;

### श्लोक

**हिच्या कर्णावतंसानें यावभ्दूषण जिंकिलें ॥**
**तशींच शोभती हीचीं दिव्य श्रवणकुंडलें ॥ १ ॥**

एथें '**कर्ण**' व '**श्रवण**' हीं पदें अधिक आहेत म्हणून अशा स्थलीं कर्ण व श्रवण ह्या शब्दांनीं **कर्णस्थित**, **श्रवणस्थित** असा अर्थ बोधित होतो.

**ज्या** म्हणजे **धनुष्याची** दोरी, **माला** म्हणजे पुष्पांचीच, **हार** म्हणजे मुक्ताफलांचाच, असें असून **धनुर्ज्या**, **पुष्पमाला**, **मुक्ताहार**, असे प्रयोग आढळतात, तेथें **धनु**:शब्देंकरून धनुष्यावर चढविलेली, **पुष्प**शब्देंकरून उत्तम पुष्पें, **मुक्ता**शब्देंकरून इतर रत्नांनीं अमिश्रित अशा मुक्ता (मोत्यें), असा अर्थ करण्याचा संप्रदाय आहे.

आतां ज्या शब्दांचा ह्या रीतीनें प्राचीन प्रसिद्ध कवींनीं प्रयोग केला असेल त्या शब्दांचाच प्रयोग नवीन काव्यांत केला तर चालतें; परंतु त्याप्रमाणेंच '**जघनकांची**' '**करकंकण**' असे अपूर्व व नवीन शब्दप्रयोग केले तर ते दोषावह होतात.

---

## दोषांचें ग्राह्यत्व

मागें जे **दोष** म्हणून सांगितले ते कोठें कोठें दोषरूप असत नाहींत, म्हणजे काव्यास दूषित करीत नाहींत, आणि कोठें कोठें तर उलटें त्यास **भूषित** करितात; आणि जेव्हां ते असे काव्यास भूषित करितात, तेव्हां त्यांची गणना **गुणांत** होते; तो प्रकार असा.

**वक्ता** जर **कोपयुक्त** आहे, किंवा वर्णनीय अर्थ **उद्धत** आहे, किंवा **रौद्ररस** प्रस्तुत आहे, तर अतिशयित श्रुतिकटुत्व (कर्णकठोरत्व) हा दोष असून अशा स्थळीं काव्यास फारच शोभा देतो म्हणून ह्याची गणना **गुणांत** करितात.

**शांतरस** वर्ण्य असून तदंगत्वेंकरून देहादिकांचें तुच्छत्व कथिलें असतां त्या प्रसंगीं आलेलें **अश्लीलत्व** हें **गुणरूपच** होतें. जसें;

### अभंग

**नाकांत शेंबूड मुखामाजी लाळ सांठवीलें मळमूत्र पोटीं ॥**
**ऐसी घाणेरडी काया ही असूनी प्रीय प्राणाहूनी लागे मूढां ॥ १ ॥**

**निहतार्थत्व** व **अप्रयुक्तत्व** हे दोष **श्लेषादिकांच्या** ठायीं **अदोषरूप** होतात.

विहिताचा अनुवाद असतां, व विषाद, आश्चर्य, क्रोध, दैन्य, लाटानुप्रास, करुणा, प्रार्थना, प्रसादन, अर्थांतरसंक्रमितवाच्य, हर्ष, आणि **अवधारण**, ह्यांच्या ठायीं **पुनरुक्ति** हा **गुण** होय. जसें;

**श्लोकार्ध**

**" उदयीं तांबडा सूर्य अस्तकालींहि तांबडा "** ॥

एथें विहिताचा **अनुवाद** आहे.

**आर्यार्ध**

**" सखि हाय हाय गेला गेला गे मत्प्रिय प्रवासाला ! "** ॥

एथें **विषाद** आहे.

**आर्यार्ध**

**" नयनां कुरंगनयना फिरवुनियां मारिताति तरुणाला "** ॥

एथें **लाटानुप्रास** आहे.

**श्लोकार्ध**

**" वसंतीं काक तो काक तैसाचि पिक तो पिक "**

एथें अर्थांतर **संक्रमितवाच्यरूप ध्वनि** आहे. अशींच **करुणा**; **आश्चर्य** इत्यादिकांचीं उदारणें अन्यत्र पाहावीं.

अनुकरणकर्तव्य असतां श्रुतिकटुत्वादि सर्वहि दोष **अदोषरूपच होतात** असें जाणावें.

**संदिग्धत्व** हें व्याजस्तुतिपर्यवसायि असतां **गुण** होय. नीच व हलके अशा लोकांच्या भाषणांत **ग्राम्यत्व** हें गुण होय. जो अर्थ **प्रसिद्ध** आहे त्याविषयीं **निर्हेतुत्व** हा दोष **अदोषरूप** होय.

लोकप्रसिद्धीच्या विरुद्ध अर्थाचें वर्णन केलें असतां **प्रसिद्धिविरुद्धतारूप** दोष सांगितला; परंतु तें वर्णन **कविसंप्रदायास** अनुसरून असेल तर तो **दोष न** होतां उलटा **गुणच** होतो.

---

## कविसंप्रदाय

**कविसंप्रदाय** ज्यांस **कविसंकेत** असेंहि म्हणतात, ते पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत.

आकाश व पाप ह्यांचा वर्ण **काळा**; हास्य व कीर्ति यांचा वर्ण **पांढरा**; प्रीति व क्रोध यांचा वर्ण **तांबडा**; चकोरांनीं चंद्रिका पिणें; नद्या व समुद्र यांत कमलें असणें; राजहंसादि पक्षिसंघानें जलाशयमंडित असणें; वर्षाकाळीं **हंसाचें मानससरोवराप्रत** जाणें; **स्त्रियांच्या** पादाघातेंकरून **अशोकवृक्षाला फुलें** येणें; स्त्रियांच्या तोंडांतील मद्याच्या चुळानें **बकुलवृक्षास फुलें** येणें; तरुणांचे हार व हृदय **विरह** संतापानें **फुटणें**; **मदनाचे** बाण **पुष्परूप**, त्याचें धनुष्यहि **फुलाचें**, त्याच्या धनुष्याची दोरी **भ्रमरपंक्ति** असणें; **मदनाच्या बाणें**करून व **स्त्रियांच्या कटाक्षें**करून तरुणांचें हृदय **फुटणें**; सूर्याच्या योगानें **पद्मांचा** व **चंद्राच्या** योगानें **कुमुदांचा विकास होणें**; **मेघगर्जना** ऐकून **मयूरांनीं** नृत्य करणें; **अशोकाला** फळें नसणें; वसंत ऋतूंत **जाईला** फुलें न येणें; **चंदनवृक्षाला** पुष्पें फळें नसणें; इत्यादिक **विख्यात कवींच्या** मान्य काव्यांत व प्रबंधांत त्यांचे **संप्रदाय** किंवा **संकेत** आढळतात ते येथें संक्षेपानें लिहिले आहेत, यांचीं उदाहरणें मोठाल्या आकर ग्रंथांत पहावीं.

**स्त्रीच्या कोणत्या कृत्यानें कोणत्या वृक्षांस दोहद होतो याविषयीं :**

**श्लोक** 332346

**स्त्रीच्या स्पर्शे प्रियंगूप्रति अणि बकुलां मद्यगंडूषकांनीं ॥**
**पादाघातें अशोका, तिलक कुरबकां वीक्षणालिंगनांनीं ॥**
**मंदारा नर्मवाक्यें, सुरुचिर हसनें चंपका येइ बार ॥**
**आम्रा फुंकें; नमेरू फुलति कलरवें, नर्तनें कर्णिकार ॥१॥**

स्त्रीचा स्पर्श, मद्याची चूळ, पादाघात, वीक्षण, आलिंगन, नर्मभाषण, सुंदर हांसणें, तोंडानें फुंकारा घालणें, सुस्वर गाणें आणि नृत्य करणें, ह्यांच्या योगानें क्रमेंकरून प्रियंगु (वाघांटी) बकुल, अशोक, तिलक, कुरबक (कोन्हाटा), मंदार, चंपक, आम्र (आंबा), नमेरु, (देवसुरंगी), कर्णिकार (पांगारा), या वृक्षांला फुलांचा बार येतो असा कविसंप्रदाय आहे.

ह्या प्रकारेंकरून **अप्रतीतत्व**, **कष्टत्व** इत्यादि दुसरेंहि कांहीं दोष कारणपरत्वें **अदोषरूप** व क्वचित् **गुणरूपहि** होतात.

सारांश दोषांच्याठायीं काव्यास दूषित करण्याचें जें बीज असतें तें कांहीं कारणानें व प्रसंगवशानें क्षीण होऊन नाहींसें झालें तर ते दोष **अदोषरूप** होतात, व प्रसंगविशेषीं तर तेच दोष काव्यास **भूषित** करणारे होऊन उलटे **गुणरूपानें** गणिलें जातात असें जाणावें.

---

# प्रकरण नववें

## पुरवणी : छंद

प्रकरण सातमध्यें छंदाविषयीं निरूपण आलेंच आहे. त्यांत कांहीं कमी वाटल्यावरून येथें आणखी दोन तीन प्रकरणें माहितीकरितां थोडक्यांत सांगतों.

### १. वैतालीय प्रकरण

वैतालीय हा एक मात्राछंद आहे. ह्याचे चार चरण असतात. त्यांत विषम म्हणजे पहिला व तिसरा ह्या चरणांत चौदा चौदा व सम म्हणजे दुसरा व चौथा ह्या चरणांत सोळा सोळा मात्रा असतात. विषमचरणांतील चौदा मात्रांपैकीं पहिल्या सहा मात्रा, सहा लघु अक्षरें योजून किंवा लघु व गुरु अशीं मिश्र अक्षरें योजून पूर्ण कराव्या. समचरणांतील सोळा मात्रांपैकीं पहिल्या आठ मात्रा लघु व गुरु अशा मिश्रित अक्षरांनींच पूर्ण केल्या असल्या पाहिजेत. विषमचरणांतील सहा मात्रांपुढील ज्या आठ मात्रा व समचरणांतील आठ मात्रांपुढील ज्या आठ मात्रा त्या प्रथम रगण ( ऽ । ऽ ) त्यापुढें एक लघु व त्यापुढें एक गुरु अशा अक्षरांनीं पूर्ण कराव्या. या छंदांत जीं द्विमात्रात्मक ( गुरु ) अक्षरें येतील तीं समविषममात्रायोगघटित म्हणजे त्या अक्षरांतील पूर्वमात्रासम व उत्तरमात्राविषम अशा दोन मात्रांचा योग होऊन बनलेलीं नसावीं. विषमसममात्रायोगघटित म्हणजे पूर्वमात्रा विषम व उत्तरमात्रा सम ह्यांचा योग होऊन बनलेलीं अशीं असावीं. ह्या वैतालीय छंदांत विषमवृत्त व अर्धसमवृत्त हे दोन प्रकार येतात. समवृत्त हा प्रकार मुळींच नाहीं. वैतालीय छंदाचें विषमवृत्ताचें हें पुढील उदाहरण होय :

**ईशपदालागिं सर्वदा । आठविं चित्तामाजि सर्वदा ।**
**मनुजा भजतां तया खरें । इष्टप्राप्ति क्षिप्र होय रे ।।**

वैतालीय छंदांतील अर्धसमवृत्तांपैकींच एक वृत्त ज्यास **'अपरवक्त्र'** किंवा **'वियोगिनी'** असें म्हणतात, त्यांतील पहिल्या चरणांत **स स ज ग** ( ।।ऽ, ।।ऽ, ।ऽ।, ऽ, ) व दुसऱ्या चरणांत **स भ र ल ग** ( ।।ऽ, ऽ।।, ऽ।ऽ, ।, ऽ, ) हे गण अनुक्रमें असतात. याप्रमाणेंच तिसऱ्या व चौथ्या चरणांचें जाणावें. अशा रीतीनें हीं दोनहि अर्धें समान असल्यामुळें हें अर्धसमवृत्त होय.

रघुवंशांतील ( अजविलापनामक ) आठवा, कुमारांतील चौथा, किरात, माघ, व नैषध, ह्यांतील दुसरा हे सर्ग त्या त्या काव्यांच्या कवींनीं संस्कृत भाषेंत याच कोमल व मधुरवृत्तांत बांधले आहेत. त्या वृत्ताचें हें पुढील मराठींत उदाहरण :

**हरिच्या पदपंकजा धरा, हृदयामाजि कधीं न विस्मरा ।।**
**नर हो सकलाहि आपदा, हरुनी ठेविल तो सुखी सदा ।।**

## औपच्छंदसिक

**वैतालीय** छंदाच्याच प्रत्येक चरणाच्या शेवटीं एक गुरुअक्षर योजिलें म्हणजे तें औपच्छंदसिक होतें. या छंदांतहि विषम व अर्धसम अशीं दोन प्रकारचीं वृत्तें आहेत, त्यांतील विषमवृत्तांपैकीं एका प्रकारच्या वृत्ताचें हें पुढील उदाहरण होय :

**ईशपदालाची सर्वदा त्या, आठविं चित्तामाजि सर्वदा त्या ।**
**मनुजा भजतां तया विलोकी, इष्टप्राप्ति क्षिप्र होय लोकीं ।।**

ह्याच **औपच्छंदसिक** छंदाचा अर्धसमवृत्तांपैकीं ज्या वृत्ताच्या प्रत्येक अर्धांत **स स ज ग ग** आणि **स भ र य** हे गण अनुक्रमें येतात, त्या वृत्ताचें नांव

## पुष्पिताग्रा

होय. त्याचें हें पुढील उदाहरण :

**हरिच्या पदपंकजा धरावें, हृदयामाजि कधीं न विस्मरावें ।**
**नर हो सकलाहि आपदांतें, हरुनी ठेविल तो सुखी तुम्हांतें ।।**

## २. वत्क्र प्रकरण

## ( अनुष्टुप्छंद )

**अनुष्टुप्** हा अक्षरछंद आहे. ह्याच्या प्रत्येक चरणांत आठ अक्षरें असतात. ह्या अक्षरांची लघूच्या ठिकाणीं गुरु व गुरूच्या ठिकाणीं लघु असा फेरबदल करून त्यांचा प्रस्तार केला असतां २५६ रूपें ( वृत्तें ) उत्पन्न होतात. त्यांत १३ मुख्य असून त्यांतून **प्रमाणिका, विद्युन्माला** व **माणवक** ह्या तीन वृत्तांचीं नांवें पूर्वीं अक्षरवृत्तांच्या कोष्टकांत निर्दिष्ट केलीं आहेत. त्यांखेरीज ज्यांस **अनुष्टुप्**श्लोक असें लोकांत म्हणण्याची रूढी आहे, व पुराणादि संस्कृत ग्रंथांत ज्यांचा मोठा भरणा आढळतो व जे प्राकृतांतहि

बरेच आढळण्यांत येतात, त्या **अनुष्टुप्**श्लोकांविषयीं येथें थोडी माहिती सांगतों.

संस्कृत ग्रंथांत अनुष्टुप्छंदाचे पोटांत एक प्रकार सांगितला आहे त्याचें नांव

**वत्क्र**

ह्याचें लक्षण असें आहे : ज्याच्या चारहि चरणांत प्रत्येकीं पहिलें व शेवटलें अक्षर गुरु किंवा लघु असतें, व पहिल्या अक्षरापुढें आठ गणांपैकीं **न** ( सर्वलघु ) व **स** ( अंत्यगुरु ) हे दोन गण वर्ज्य करून बाकीच्या सहा गणांतून कोणताहि एक गण असतो–त्याच्यापुढें म्हणजे पहिल्यापासून चौथ्या अक्षरापुढें **य** ( आदिलघु ) गण असतो. त्यास **वत्क्र** असें म्हणतात. उदाहरण :

**श्लोक**

**सदा जो सेवितो देवा, सुखाचा त्या मिळे ठेवा ॥**
**कधींही नाचरी पापा, तुला मी सांगतों बापा ॥ १ ॥**

ह्या वृत्ताच्या प्रत्येक चरणांत पहिल्या अक्षरापुढें **न** व **स** हे दोन गण वर्ज्य करायास सांगितलें; तसें समचरणांत पहिल्या अक्षरापुढें ते दोन गण वर्ज्य करून आणखी **र** गणहि वर्ज्य करावा असें सांगितलें आहे.

ह्या **वत्क्र**नामक भेदाचे **पथ्यावत्क्र, विपरीतवत्क्र** इत्यादि अनेक पोटविभाग आहेत त्यांचीं नांवें, लक्षणें व उदाहरणें पुढें सांगतों :

१. **पथ्यावत्क्र**–वत्क्राच्या समचरणांतील चौथ्या अक्षरापुढें **ज गण** योजिला असतां तें **पथ्यावत्क्र** होतें. जसें :

**सदा जो सेवितो देवा, सुखाचा लाभ त्या नवा ॥**
**कधींहि नाचरी पापा, सुशीला राखण्या जपा ॥ १ ॥**

२. **विपरीतवत्क्र**–वक्राच्या विषमचरणांतील चौथ्या अक्षरापुढें **ज गण** योजिला असतां तें **विपरीतवत्क्र** होतें. जसें :

**सुखाचा लाभ त्या नवा, सदा जो सेवितो देवा ॥**
**सुशीला राखण्या जपा, कधींही नाचरा पापा ॥ १ ॥**

३. **चपलावत्क्र**–वत्क्राच्या विषमचरणांतील चौथ्या अक्षरापुढें **न गण** योजिला असतां **चपलावत्क्र** होतें. जसें :

**सदा जो सेवि हरितें, त्या सुखाप्ति खरी होते ॥**
**म्हणोनी त्या भज नरा, सुखसंपत्तिदातारा ॥ १ ॥**

४. **युग्मविपुला**–वत्क्राच्या समचरणांत सातवें अक्षर लघु योजिलें असतां ती **युग्मविपुला** होते. जसें :

**श्रीविश्वेशा जगत्पाळा, सभ्दक्तसुखदातया ॥ १ ॥**

**जोडोनियां करातें मी, नमितों सर्वदा तया ॥ १ ॥**

**भविपुला, रविपुला, नविपुला व तविपुला**–, विपुला वत्क्राच्याच विषमचरणांतील चौथ्या अक्षरापुढें **भ र न व त** हे गण योजिले असतां क्रमानें त्या **भविपुला, रविपुला, नविपुला** व **तविपुला** होतात. अनुक्रमानें उदाहरणें :

**भविपुला**

**ईश्वराला जे भजती, ते सदा सुख पावती ॥**

**त्यालाच जाणें शरण, तेंच बा मोक्षसाधन ॥ १ ॥**

**रविपुला**

**देवाला जे सेवितातो ते सदा सुख पावती ॥**

**मोक्ष त्यांना प्राप्त होय, असे हा शास्त्रनिश्चय ॥ १ ॥**

**नविपुला**

**देवा भजे नर सदा, मिळे त्या सुख संपदा ॥**

**मानिती लोक सगळे, त्यालांचि श्रेष्ठतेमुळें ॥ १ ॥**

**तविपुला**

**जो प्रेमें देवा सेवितो, तो सदा सुख पावतो ॥**

**त्याला न विघ्नें बाधती, ऐसें शास्त्रज्ञ बोलती ॥ १ ॥**

---

**टीप.** ह्या अनुष्टुप् छंदाचे पोटांतील पथ्यावत्क्र व युग्मविपुला हींच वृत्तें पुराणदिकांत विशेष आढळतात, इतर **वत्क्र, विपरीतवत्क्र** इत्यादि तादृश्य आढळत नाहींत. तथापि त्यांचीं लक्षणें व उदाहरणें प्रसंगोपात्तत्त्वेंकरून विद्यार्थ्यांस माहीत होण्याकरितां लिहिलीं; इतकेंच.

## २. मात्रासमक प्रकरण

हा मात्राछंद आहे. याचे चार चरण असतात. प्रत्येक चरणांत मात्रा सोळा असतात. हा मात्राछंद असल्यानें चार चार मात्रांचा एकेक गण या मानानें चार गणांनीं सोळा मात्रांची भरती होते. यांत प्रत्येक छंदाच्या मात्रा समान असल्यामुळें यास मात्रासमक असें नांव आहे. ह्याचें पोटीं मुख्य पांच प्रकार शुद्ध असून ते पांच मिळून एक सहावा मिश्रित प्रकार आहे. त्यांचीं नांवें, लक्षणें व उदाहरणें अशीं :

प्रकार १ ला : **मात्रासमक** : ज्यांत पहिले दोन गण म्हणजे आठ मात्रा झाल्यावर नवव्या मात्रास्थानीं एक लघु अक्षर असतें, त्यास **मात्रासमक** असें म्हणतात. जसें :

**पुण्याचरणीं मनि कंटाळा, परधनदारावरि बहु डोळा ॥**
**ऐशा कर्में यम निजपाशीं, बांधुनि धाडिल तुज नरकाशीं ॥**

प्रकार २ रा : **विश्लोक** : पहिल्या गणाच्या पुढें पांचव्या व आठव्या मात्रास्थानीं एक एक लघु अक्षर असतें, त्यास **विश्लोक** असें म्हणतात. जसें :

**आशा सकलहि मनच्या सोडीं,**
**बा पातकतरु मुळिंहुनि तोडीं ॥**
**देवा निशिदिनिं चित्तीं ठेवीं,**
**तत्पद सुखकर यास्तव सेवीं ॥ १ ॥**

प्रकार ३ रा : **वानवासिका** : ज्यांत दोन गणांनंतर नवव्या व बाराव्या मात्रास्थानीं एक एक लघु अक्षर असतें, त्यास **वानवासिका** म्हणतात. जसें

**सोडुनि सारी गृहधनखंती,**
**ईशपदाला निशिदिनिं चिंती ॥**
**तोचि तुला भवजलनिधिपारा,**
**नेउनि देइल निजपदिं थारा ॥ १ ॥**

प्रकार ४ था : **चित्रा** : ज्यांत पांचव्या, आठव्या व नवव्या मात्रास्थानीं लघु अक्षरें असतात, त्यास **चित्रा** असें म्हणतात. जसें :

**ईश्वरपदकमलचि तूं सेवी,**
**आशा धनसुतसदनिं न ठेवी ॥**
**पापा चरणिं न तुज होउ रती,**
**स्वर्गावर चढविल हीच कृती ॥ १ ॥**

प्रकार ५ वा : **उपचित्रा** : ज्यांत दोन गणांच्या म्हणजे आठ मात्रांच्या पुढें नवव्या मात्रास्थानीं एक गुरु अक्षर असतें, त्यास **उपचित्रा** असें म्हणतात. जसें :

**देवालागी भावबळानें,**
**आकळिशी जरि शुद्धमनानें ॥**
**तोचि तुझ्या सकला विपदाला,**
**हारुनि देइल मोक्षपदाला ॥ १ ॥**

प्रकार ६ वा : **पादाकुलक** : ज्यांतील चारहि पाद पूर्वोक्त पांच वृत्तांच्या पादांनीं मिश्रित असतात, त्यास त्यांतील पादांच्या संकरामुळें **पादाकुलक** म्हणतात. जसें :

**" न्यायार्जित मिठभाकर खावी । " ( १ हा पाद उपचित्रा )**
**" लोकहितास्तव तनु झिजवावी ॥ " ( २ हा पाद वनवासिका)**
**" हेंचि महातप सुमती वदती । " ( ३ हा पाद मात्रासमक )**
**" जेणें लवकरी मिळते सुगती ॥ १ ॥ " ( ४ हा पाद चित्रा )**

वरील श्लोकाचे चार पाद, अनुक्रमें **उपचित्रा, वानवासिका, मात्रासमक** व **चित्रा** वेगळाल्या वृत्तांचे असल्यामुळें, हें **पादाकुलक** झालें. आणखी श्लोक :

**जो का सृष्टिस्थितिलयकर्ता,**
**शरणागतजन भवभयहर्ता ॥**

**भाव धरुनियां अंतःकरणीं,**
**लावी मनुजा मन तच्चरणीं ॥ १ ॥**

---

**बाळपणीं तू करिशी क्रीडा,**
**तरुणपणीं बहु मन्मथपीडा ॥**
**वृद्धपणीं चिंतेंतचि बुडशी,**
**ईश्वरचरणीं न कधीं जडशी ॥**

---

**कोण मि कैंचा कोठुनि आलों,**
**कोण पितर मी कोठुनी झालों ॥**
**ज्ञानसरोवरिं होउनि मासा,**
**दे टाकुनिया स्वप्नविलासा ॥ १ ॥**

---

वरील पांचहि वृत्तांमध्यें प्रत्येक चरणाचे शेवटील अक्षर गुरु असावें व ज्या द्विमात्रकगुरु अक्षरांत पूर्व मात्रा **सम** व उत्तर मात्रा **विषम** अशा दोन मात्रांनीं बनलेलें असेल तें गुरु अक्षर योजूं नये; खेरीज प्रतिवृत्ताचे जे नियम सांगितले आहेत, ते पाळून बाकीचे मात्रागण किंवा गुरु लघु अक्षरें पाहिजेत तीं योजिलीं असतां चालतें. ह्या वृत्तांतून ज्या वृत्ताच्या पादांत अनेक वृत्तांच्या लक्षणांचा संकर असतो, त्या वृत्तासहि पादाकुलक असें म्हणतात. जसें:

**मनुजा निशिदिनिं हरिस भजावें,**
**भंगुर अवघें जग समजावें ॥**
**दारासदनसुतलोभ न बरवा,**
**कोणाचीही नचि करि परवा ॥ १ ॥**

ह्या श्लोकांतील पहिल्या पादांत **मात्रासमक, विश्लोक, चित्रा** व **वानवासिका** ह्यांचा, आणि दुसरे पादांत **मात्रासमक** व **वानवासिका** ह्यांचा, आणि तिसऱ्या पादांत **विश्लोक व उपचित्रा** ह्यांचा आणि चौथ्या पादांत **मात्रासमक व वानवासिका** ह्यांचा संकर आहे. सारांश एकेच पद्यांत वेगळाल्या वृत्तांच्या

पादांचा संकर असणें, किंवा एके पादांत अनेक वृत्तलक्षणांचा संकर असणें, ह्या दोहींनींहि **पादाकुलक** होतें असेंहि मत आहे.

**विश्लोक** वृत्तांत द्वितीय गणस्थानीं व **वानवासिका** वृत्तांत तृतीय गणस्थानीं **ज** गण योजावा असेंहि मत आहे. तेव्हां **ज** गणांतील दुसरें अक्षर समविषम-मात्रायोगघटित (दुसरी व तिसरी या दोन मात्रा मिळून बनलेलें गुरु) आहे, म्हणूनच तो गण ह्या **मात्रासमक** प्रकरणीं वर्ज्य आहे; तरी ह्या स्थलीं त्याचा दोष नाहीं, असा अभिप्राय दिसतो. जसें :



**जो का सदा भजे हरिचरणा,**
**लाभे भवाब्धिच्या तो तरणा ॥**
**लाभ गणी जो वधूरतीचा,**
**त्यास म्हणति खर नराकृतीचा ॥ १ ॥**

ह्या श्लोकांतील पहिल्या व दुसऱ्या चरणांत द्वितीयगणस्थानीं, आणि तिसऱ्या व चौथ्या चरणांत तृतीयगणस्थानीं **ज** गण योजिला आहे; म्हणून ते ते चरण अनुक्रमें **विश्लोक** व **वानवासिका** ह्या वृत्तांचे झाले. ह्यांत दुसऱ्याहि वृत्ताच्या लक्षणाचा संकर आहे, म्हणून हेंहि **पादाकुलक वृत्त** होय.

हीं वृत्तें तालसुरावर म्हणतां येतात. ह्यांतील चरणांत शेवटीं यमकहि साधलें असतें, म्हणून तीं कानास फारच गोड लागतात. श्रीमच्छंकराचार्यादि उपदेशकांनीं वैराग्यपर चटकदार फटके संस्कृत भाषेंत याच वृत्तांत केले आहेत. त्यांतील कांहीं फटके कोणी कोणी सरस हरदास लोक आपले कीर्तनांत प्रसंगविशेषीं तालसुरावर ठेका धरून अवसानानें म्हणतात. तेव्हां कीर्तनास फारच रंग येऊन श्रोतृमंडळीचीं अंतःकरणें आनंदभरित होऊन तल्लीन होतात. त्यांचा थोडा मासला वाचकांस कळावा म्हणून तो येथें देतों.

**श्लोक**

**पुनरपि जननं पुनरपि मरणं**
**पुनरपि जननीजठरे शयनं ॥**

इह संसारे खलु दुस्तारे;
कृपया पारे पाहि मुरारे ॥ १ ॥

---

बालस्तावत् क्रीडासक्त,-
स्तरुणस्तावत् तरुणीरक्तः ॥
वृद्धस्तावत् चिंतामग्नः,
परमे ब्रम्हणि कोपि न लग्नः ॥

---

अंगं गलितं पलितं मुंडं,
दशनविहीनं जातं तुंडं ॥
वृद्धो याति गृहीत्वा दंडं,
तदपि न मुंचत्याशापिंडं ॥

---

अर्थमनर्थं भावय नित्यं,
नास्ति ततः सुखलेशः सत्यं ॥
पुत्रादपि धनभाजां भीतिः
सर्वत्रैषा विदिता रीतिः ॥

---

का ते कांता कस्ते पुत्रः
संसारोऽयमतीव विचित्रः ॥
कस्य त्वं वा कुत आयात,-
स्तत्वं चिंतय तदिदं भ्रांतः ॥

---

मा कुरु धनजनयौवनगर्वं,
हरति निमेषात्कालः सर्वं ॥
मायामयमिदमखिलं हित्वा,
ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा ॥

---

हीं वैराग्यपर चुटक्यांचीं उदाहरणें होत.

**श्लोक**

**अलिवाचालितविकसितचूते,**
**काले मदनसमागमदूते ।।**
**स्मृत्वा कांतां परिहृतसार्थः,**
**पादाकुलकं धावति पांथः ।। १ ।।**

हा श्लोक श्रृंगाररसपर असून ह्यांत **पादाकुलक** हें वृत्ताचें नांवहि साधलें आहे. अशा प्रकारचे चमत्कारिक श्लोक संस्कृत छंदोग्रंथांत बहुत आहेत.

ह्याप्रमाणें **वैतालीय, औपच्छंदसिक,** अनुष्टुभापैकीं **वत्क्र,** आणि **मात्रासमक** हे छंद मराठींत कोठें कोठें आढळतात. त्यांचें स्वरूपज्ञान विद्यार्थ्यांस व्हावें, याकरितां तीं प्रकरणें येथें संक्षेपानें निरूपित केलीं असत.

---

# प्रकरण दहावें

## वर्णप्रस्तार

प्रत्येक छंदांत गुरुलघु अक्षरांची फेरबदल केल्यानें वेगळालीं अनेक वृत्तें उत्पन्न होतात. त्या संबंधानें संस्कृत **छंदःशास्त्रवेत्त्यांनीं** छंदशास्त्राच्या अंगत्वेंकरून हें प्रस्तारप्रकरण विस्तारानें सांगितलें आहे. त्यांत **नष्ट** म्हणजे प्रस्तारांतील एखादा रूपभेद नाहींसा झाला असतां तो कसा असावा, व **उद्दिष्ट** म्हणजे प्रस्तारांतील एखादें रूप लिहून वगैरे दिलें असतां तें त्या प्रस्तारांत कितवें असावें, व प्रस्तारांतील एकंदर रूपांची संख्या, व त्यांत एक द्वि, त्रि इत्यादि लघ्वात्मक गुर्वात्मक रूपें किती ? व तीं त्या प्रस्तारांत कितव्या स्थानीं, असावीं ? इत्यादि वेगळ्या वेगळ्या तऱ्हेचे प्रश्न सोडविण्याची युक्ति गणिताच्या आधारानें बसविल्या आहेत, त्या फारच **चमत्कारिक** आहेत. त्यावरून त्या युक्ति बसविणाऱ्या पंडिताचीं कल्पनाशक्ति अद्भुत होती असें लक्षांत येतें. त्याचा थोडा मासला मराठी वाचकांस कळावा म्हणून त्यांतील **वर्णप्रस्ताराचें** प्रकरण येथें थोडक्यांत सांगतों. या प्रकरणाचे मूळचे अनेक विभाग आहेत त्यांस **प्रत्यय** असें म्हणतात; त्यांतून सहा **प्रत्यय** आम्हीं प्रस्तुत येथें घेतले आहेत; त्यांचीं नांवें : **१. प्रस्तार, २. सूची, ३. नष्ट, ४. उद्दिष्ट, ५. मेरु** ( एकद्व्यादिलगक्रिया ) व **६. पताका.** त्यांचीं लक्षणें व उदाहरणें येणेंप्रमाणें:

**प्रत्यय १ ला : प्रस्तार** : कोणत्याहि छंदाच्या अक्षरसंख्येवरून त्यांतील अक्षरांच्या गुरुलघुपणाच्या फेरबदलीनें जी रूपभेदांची परंपरा उत्पन्न होते, त्या परंपरेला **प्रस्तार** असें म्हणतात. त्या तो **प्रस्तार** करण्याची रीति अशी : जितक्या वर्णाच्या छंदाचा **प्रस्तार** कर्तव्य असेल, तितक्या **गुरु**-वर्णांचीं पंक्ति लिहावी. ही त्या **प्रस्ताराचा** पहिला **रूपभेद** होय. नंतर त्या पहिल्या पंक्तींतील पहिल्या गुरूखालीं लघु लिहावा. त्याचे पुढील वर्ण वरील पंक्तींत असतील तेच खालचे नवीन पंक्तींत उतरावे म्हणजे तो दुसरा **रूपभेद** झाला. ह्याप्रमाणें पुढेंहि वरील पंक्तींत पहिला जो गुरु असेल त्याचेखालीं लघु लिहावा, त्याचे पुढील वर्ण वरील पंक्तींतून जसेचे तसेंच नवीन पंक्तींत उतरावें, व डाव्या हाताकडे जीं स्थलें रिकामीं राहातील तीं गुरूंनीं

पूर्ण करावीं. ह्याप्रमाणें शेवटीं सर्व लघूंची पंक्ति उत्पन्न होईल तोंपर्यंत कृति करावी; असें करून जी रूपभेदांची पंक्तिपरंपरा उत्पन्न होईल तीच तितक्या वर्णांचा **प्रस्तार** होय[1]. **प्रस्तार** करितांना गुरुवर्णाबद्दल ( ऽ ) असें व लघु-वर्णाबद्दल ( । ) असें चिन्ह योजण्याचा संप्रदाय आहे.

**१. तीन वर्णांचा प्रस्तार**

| | |
|---|---|
| १.. | ऽ ऽ ऽ |
| २.. | । ऽ ऽ |
| ३.. | ऽ । ऽ |
| ४.. | । । ऽ |
| ५.. | ऽ ऽ । |
| ६.. | । ऽ । |
| ७.. | ऽ । । |
| ८.. | । । । |

तीन वर्णांचा प्रस्तार : रूपभेद : ८

**२. चार वर्णांचा प्रस्तार**

| | |
|---|---|
| १ | ऽ ऽ ऽ ऽ |
| २ | । ऽ ऽ ऽ |
| ३ | ऽ । ऽ ऽ |
| ४ | । । ऽ ऽ |
| ५ | ऽ ऽ । ऽ |
| ६ | । ऽ । ऽ |
| ७ | ऽ । । ऽ |
| ८ | । । । ऽ |
| ९ | ऽ ऽ ऽ । |
| १० | । ऽ ऽ । |
| ११ | ऽ । ऽ । |
| १२ | । । ऽ । |
| १३ | ऽ ऽ । । |
| १४ | । ऽ । । |
| १५ | ऽ । । । |
| १६ | । । । । |

चार वर्णांचा प्रस्तार : रूपभेद : १६

**३. पांच वर्णांचा प्रस्तार**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ऽ ऽ ऽ ऽ ऽ | १७ | ऽ ऽ ऽ ऽ । |
| २ | । ऽ ऽ ऽ ऽ | १८ | । ऽ ऽ ऽ । |
| ३ | ऽ । ऽ ऽ ऽ | १९ | ऽ । ऽ ऽ । |
| ४ | । । ऽ ऽ ऽ | २० | । । ऽ ऽ । |
| ५ | ऽ ऽ । ऽ ऽ | २१ | ऽ ऽ । ऽ । |
| ६ | । ऽ । ऽ ऽ | २२ | । ऽ । ऽ । |
| ७ | ऽ । । ऽ ऽ | २३ | ऽ । । । ऽ |
| ८ | । । । ऽ ऽ | २४ | । । । ऽ । |
| ९ | ऽ ऽ ऽ । ऽ | २५ | ऽ ऽ ऽ । । |
| १० | । ऽ ऽ । ऽ | २६ | । ऽ ऽ । । |
| ११ | ऽ । ऽ । ऽ | २७ | ऽ । ऽ । । |
| १२ | । । ऽ । ऽ | २८ | । । ऽ । । |
| १३ | ऽ ऽ । । ऽ | २९ | ऽ ऽ । । । |
| १४ | । ऽ । । ऽ | ३० | । ऽ । । । |
| १५ | ऽ । । । ऽ | ३१ | ऽ । । । । |
| १६ | । । । । ऽ | ३२ | । । । । । |

पांच वर्णांचा प्रस्तार: रूपभेद : ३२

१. ह्या रीतीची विपरीत ( उलट ) रीतिनें कृति केली असतांहि प्रस्तार होतात. तेव्हां त्याचीं नष्ट उद्दिष्टेंहि काढण्यास विपरीत कृति करावी लागते.

वर तीन प्रस्तार लिहिले आहेत, ते पूर्वोक्त रीतीप्रमाणें वाचकांनीं लक्षपूर्वक मनन करून तपासून पाहावे म्हणजे त्यांस माहिती होऊन त्याप्रमाणें दुसरेहि प्रस्तार करितां येतील.

**प्रत्यय २ रा : सूची** : प्रस्तारांतील एकंदर रूपभेदांची व त्यांतील **लादि**[1] व **लान्त** व **गादि** आणि **गान्त** इत्यादि रूपभेदांची संख्या समजण्याकरितां जी अंकपंक्ति असते तिला **सूची** म्हणतात. ती करण्याची रीति:

जितक्या वर्णांची **सूची** कर्तव्य असेल तितके वर्ण डावीकडून उजवीकडे पंक्तीनें लिहावें. नंतर त्यांतील पहिल्या वर्णाच्या माथ्यावर १, दुसऱ्याच्या माथ्यावर २, तिसऱ्याच्या माथ्यावर ४, याप्रमाणें द्विगुणित द्विगुणित अंक लिहावे. म्हणजे ती अंकपंक्ति **सूची** होय. त्या सूचीचे अंत्य अंकास दोहोंनीं गुणिलें असतां तो गुणाकार त्या प्रस्तारांतील एकंदर रूपभेदांची संख्या होय व **सूची**चा जो अंत्य अंक असेल ती त्या प्रस्तारांतील **लादि** व **गादि** आणि **लान्त** व **गान्त** ह्या चारहि प्रकारच्या रूपभेदांची संख्या होय व **सूची**चा जो उपांत्य ती त्या प्रस्तारांतील लादि असून लान्त व गादि असून गान्त अशा रूपभेदांची संख्या होय.

उदाहरण: तीन वर्णांच्या प्रस्तारांत एकंदर रूपभेदांची व त्यांतील **लादि** व **गादि** आणि **लान्त** व **गान्त** ह्या रूपभेदांची, व **लादि** असून **लान्त** व **गादि** असून **गान्त** अशा रूपभेदांची संख्या किती ? असा प्रश्न आहे तर,

## कृति

| | १. तीन वर्ण. | २. चार वर्ण. | ३. पांच वर्ण. |
|---|---|---|---|
| द्विगुणित अंकपंक्ति | १, २, ४. | १, २, ४, ८. | १, २, ४, ८, १६. |
| वर्णांची पंक्ति | ऽ, ऽ, ऽ. | ऽ, ऽ, ऽ, ऽ. | ऽ, ऽ, ऽ, ऽ, ऽ. |

## खुलासा

ह्या उदाहरणांत प्रथम तीन, चार व पांच अशा वर्णांच्या पंक्ति लिहिल्या. मग त्यांच्या माथ्यावर १, २, ४ इत्यादि अंक एकापासून आरंभ करून द्विगुणित द्विगुणित असें लिहिले. तेव्हां १, २, ४ ही तीन वर्णांची व १, २,

१. छंद:शास्त्रांत लघु अक्षरास **ल** व गुरु अक्षरास **ग** असें म्हणण्याची परिभाषा आहे, तिजप्रमाणें **लादि** म्हणजे लघ्वादि, **लान्त** म्हणजे लघ्वंत, **गादि** म्हणजे गुर्वादि व **गान्त** गुर्वंत असें समजावें.

४, ८ ही ४ वर्णांची व १, २, ४, ८, १६ ही पांच वर्णांची **सूची** झाली. म्हणून तीन वर्णांच्या **सूची**चा अंत्यांक ४, यास दोहोंनीं गुणून आले ८, ही तीन वर्णांच्या प्रस्तारांतील एकंदर रूपभेदांची संख्या होय व अंत्य अंक ४, ही त्या प्रस्तारांतील **लादि, गादि, लान्त** व **गान्त** इतक्या रूपभेदांची प्रत्येकीं संख्या होय व उपांत्य २, ही त्याच प्रस्तारांतील **लादि असून लान्त व गादि** असून **गान्त** अशा रूपभेदांची संख्या होय.

ह्याप्रमाणेंच चार वर्णांची **सूची** व पांच वर्णांची **सूची** यांचे अंक पाहून त्यावरून संख्या काढाव्या त्या अशा :

## उदाहरण २ रें

**चार वर्णांची सूची**

१, २, ४, ८.

सूचीचा अंत्यांक ८ × २ बरोबर एकंदर प्रस्तारांतील रूपभेदांची संख्या १६. सूचीचा अंत्यांक ८ = **लादि** वगैरे रूपभेदांची संख्या सूचीचा उपांत्य ४ = **लादि** असून **लान्त** व **गादि** असून **गान्त** अशा रूपभेदांची संख्या होय.

## उदाहरण ३ रें

**पांच वर्णांची सूची**

१, २, ४ ८, १६.

सूचीचा अंत्यांक १६ × २ = ३२ ही एकंदर रूपभेदांची संख्या **अंत्यांक** १६ = **लादि** वगैरे रूपभेदांची संख्या सूचीचा **उपांत्यांक** ८ = **लादि** असून **लान्त** व **गादि** असून **गान्त** रूपभेदांची संख्या होय.

**प्रत्यय ३ रा : नष्ट : प्रस्तारांतील** अमुकावें रूप **नष्ट** किंवा नाहींसें झालें, तें कसें असावें? ह्या प्रकारास **नष्ट** म्हणतात. त्याचें उत्तर काढण्याची रीति अशी :

**नष्ट** झालेलें रूप कितवें ती संख्या मांडावी. नंतर, वर्णसंख्येंत एक कमी इतक्या संख्येच्या **निमपटी** करून एकापुढें एक पंक्तीनें लिहाव्या. त्यांत जिची **निमपट** बरोबर निघणार नाहीं, ती सैक करून म्हणजे तिच्यांत एक मिळवून तिची निमपट करावी. नंतर त्या एकंदर अंकपंक्तींत **विषम** अंकाखालीं **गुरु** (ऽ), व **सम** अंकाखालीं **लघु** (।), अशीं चिन्हें लिहावीं. जी पंक्ति येईल तें **नष्ट** झालेलें रूप होय असें जाणावें.

**उदाहरण**:—चार वर्णांच्या प्रस्तारांतील **११ वें** रूप **नष्ट** झालें आहे, तें कसें असावें, असा प्रश्न आहे तर, त्याची कृति अशी :

| कृति | खुलासा |
|---|---|
| नष्टसंख्या[१], निम०[२], निम०[३] निम०[४],<br>(विषम) (सम) (विषम) (सम)<br>११, ६, ३, २,<br>ऽ, ।, ऽ, ।, | नष्टसंख्या ११, ती प्रथम मांडली. ती **विषम** म्हणून ती सैक करून तिची **निमपट** ६ ही संख्या पुढें लिहिली. तिच्यापुढें तिची **निमपट ३** ही संख्या |

लिहून ती **विषम** म्हणून सैक करून तिची निमपट २ ही संख्या लिहिली. याप्रमाणें वर्णसंख्या चार म्हणून त्यांत एक उणा म्हणजे तीन इतक्या निमपटी पंक्तीनें लिहिल्या. नंतर **विषम** संख्येखालीं ऽ, व **सम संख्येखालीं** ।, अशीं गुरुलघूंचीं चिन्हें लिहितां पंक्ति उत्पन्न झाली ती ( ऽ । ऽ । ) हें त्या चार वर्णांच्या प्रस्तारांतील **११ वें** रूप होय. हें उत्तर.

हें उत्तर आम्हीं चार वर्णांचा प्रस्तार दाखविला आहे, त्यांत वाचकांनीं तपासून पहावें म्हणजे खात्री होईल. अशींच आणखीहि उदाहरणें वाचकांनीं कल्पून करून पहावीं म्हणजे विशेष अनुभव येईल.

**प्रत्यय** ४ था : **उद्दिष्ट :** जेव्हां प्रस्तारांतील एखादें रूप लिहून दिलें असून तें त्या प्रस्तारांतील कितवें आहे असा प्रश्न असेल, तेव्हां **उद्दिष्ट** होतें; तें काढण्याची रीतः—सांगितलेलें रूप मांडावें. त्यांत पहिले वर्णाच्या माथ्यावर १, दुसऱ्याच्या माथ्यावर २, तिसऱ्याच्या ४, चवथ्याच्या माथ्यावर ८ याप्रमाणें द्विगुणित अंक ( सूच्यंक ) लिहावे. मग **लघू**च्या माथ्यावरील अंकांची बेरीज करून ती सैक करावी. जी संख्या येईल, तितकावें तें रूप होय असें जाणावें. उदाहरणः—चार वर्णांच्या प्रस्तारांतील ( ऽ, ।, ऽ, । ) हें रूप कितवें तें सांग. असा प्रश्न आहे.

---

१. जितक्या वर्णांचा प्रस्तार असेल तितक्या संख्येइतका २ ह्या अंकाचा घात करावा म्हणजे ती त्या प्रस्तारांतील एकंदर रूपभेदांची संख्या होते. वरील उदाहरणांत तीन वर्णांच्या, चार वर्णांच्या व पांच वर्णांच्या प्रस्तारांतील रूपभेदांची संख्या पाहिजे आहे म्हणून क्रमानें २ ह्या अंकाचा त्रिघात, चतुर्घात, व पंचघात करून संख्या आल्या त्या $(२^{३}) = ८$; $(२^{४}) = १६$; व $(२^{५}) = ३२$ ह्या होत. म्हणून तीन वर्णांच्या प्रस्तारांतील रूपभेदांची संख्या ८ व चार वर्णांच्या रूपभेदांची संख्या १६ व पांच वर्णांच्या रूपभेदांची संख्या ३२ होय. याप्रमाणें प्रस्तारांतील रूपभेदांची संख्या काढण्याची ही दुसरीहि रीति आहे.

आतां, या उदाहरणांत दिलेलें रूप ( ऽ, ।, ऽ, । ) असें आहे. त्यांतील
१, २, ४, ८,
वर्णाचे माथ्यावर १, २, ४ असे द्विगुणित अंक लिहून ( ऽ, ।, ऽ, ।, ) असें रूप झालें. त्यांतील लघूवरचे अंक २ व ८ यांची बेरीज १०, ती सैक करून झाले **११**. तेव्हां ( ऽ, ।, ऽ, । ) हें रूप चार वर्णांच्या प्रस्तारांत **अकरावें** होय हें उत्तर.

गुरु वर्णाच्या माथ्यावरील अंकांची बेरीज करून ती प्रस्तारांतील एकंदर सर्व रूपांच्या संख्येंतून वजा करून बाकी राहील ती ही संख्या असल्या प्रश्नाचें उत्तर होतें. जसें वरील उदाहरणांत गुरूच्या माथ्यावरील १, व ४, यांची बेरीज ५, ती, प्रस्तारसंख्या **१६**, हिच्यांतून वजा केली असतां बाकी ११ राहतात. हें उत्तर होय.

**प्रत्यय** ५ वा : **मेरु :** प्रस्तारांत जे अनेक रूपभेद असतात, त्यांत सर्व गुर्वात्मक रूपें किती, सर्व लघ्वात्मक रूपें किती, एकद्व्यादि गुर्वात्मक रूपें किती, एकद्व्यादिलघ्वात्मक रूपें किती, अशा संख्या समजण्याकरितां एका प्रकारची कोष्टकरचना करावी लागते, त्या रचनेच्या आकृतीवरून तिला **मेरू** असें म्हणतात.

खंड मेरू

आकृति. १ : अखंड **मेरू**. आ. २ : वामनिन्म **मेरू**. आ. ३ : दक्षिणनिन्म **मेरू**.



वर आम्हीं **अखंड मेरूची** आकृति दाखविली आहे, तिच्याप्रमाणें प्रथम दोन कोष्टकांची पंक्ति लिहून तिच्याखालीं तीन कोष्टकांची व तिच्याखालीं चार कोष्टकांची, याप्रमाणें जितक्या वर्णांचा प्रस्तार असेल तितक्या संख्ये-इतक्या कोष्टकपंक्ति एकाखालीं एक लिहाव्या. त्यांची आकृति आम्हीं वर दाखविलेल्या **मेरूच्या** आकृतीप्रमाणें म्हणजे त्यांतील पंक्ति, वरच्या पंक्ती-

पेक्षां खालची पंक्ति दोही बाजूनें अर्ध अर्ध कोष्टकानें अधिक होईल अशा रीतीनें लिहावी. नंतर प्रत्येक पंक्तीतील पहिल्या व शेवटच्या कोष्टकांतून ' १ ' हा अंक लिहावा. नंतर पहिल्या दोन कोष्टकवाल्या पंक्तींतील अंकांची बेरीज करून ती खालच्या तीन कोष्टकवाल्या पंक्तींतील रिकाम्या कोष्टकांत लिहावी. नंतर दुसऱ्या कोष्टकपंक्तींतील पहिल्या व दुसऱ्या कोष्टकांतील अंकांची व दुसऱ्या व तिसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज करून त्या दोन्ही बेरजा तिसऱ्या कोष्टकपंक्तींतील रिकाम्या कोष्टकांत लिहाव्या. नंतर तिसऱ्या कोष्टकपंक्तींतील पहिल्या व दुसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज दुसऱ्या व तिसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज, तिसऱ्या व चवथ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज करून त्या बेरजा चवथ्या कोष्टकपंक्तींतील रिकाम्या कोष्टकांत लिहाव्या. याप्रमाणें शेवटल्या कोष्टकपंक्तींतील कोष्टकें भरत तोंपर्यंत करावें, म्हणजे तो मेरू झाला. त्यांत शेवटल्या कोष्टकपंक्तींत उजवे हाताकडील शेवटल्या कोष्टकांत जो अंक असेल ती सर्वलघ्वात्मक रूपांची संख्या; त्याच्या डाव्याबाजूकडील जो अंक असेल ती एकगुर्वात्मक रूपांची संख्या; त्याच्यापुढील कोष्टकांत जी संख्या असेल ती दोनगुर्वात्मक रूपाची संख्या; याप्रमाणें पुढेंहि एकानें चढत्या अशा गुर्वात्मक संख्या जाणाव्या. व शेवटील कोष्टकांत जो अंक असेल ती सर्वगुर्वात्मक रूपांची संख्या जाणावी. उदाहरण : चार वर्णांच्या प्रस्तारांत सर्वलघ्वात्मक, एकगुर्वात्मक, दोनगुर्वात्मक, तीनगुर्वात्मक व चारगुर्वात्मक रूपें किती किती असावीं असा प्रश्न आहे. तर रीतींत सांगितल्याप्रमाणें **मेरू** काढून त्यांतील कोष्टकांत अंक, व त्यांच्या बेरजा भरून जें उत्तर आलें तें पुढें **मेरूची** आकृति काढून तिच्यांत कृती करून दाखविली आहे तिजवरून ध्यानांत येईल.

## खुलासा[1]

पुढील उदाहरणांत रीतींत सांगितल्याप्रमाणें पहिल्यानें दोन कोष्टकांची, तिच्याखालीं तीन कोष्टकांची, तिच्याखालीं चार कोष्टकांची, अशा चार वर्णांचा प्रस्तार आहे म्हणून चार कोष्टकपंक्ति एकाखालीं एक काढून **मेरू** केला. नंतर **मेरू**च्या डावे बाजूकडील पहिल्या पहिल्या सर्व कोष्टकांत व

१. पुढील अखंड मेरूंत अंक लिहून जशी कृति केली तशीच कृति, पूर्वी खंडमेरूच्या दोन आकृति दाखविल्या आहेत, त्यांत केली असतांहि उत्तर निघतें.

**मेरु**

| १ | १ |

| १ | २ | १ |

| १ | ३ | ३ | १ |

| १ | ४ | ६ | ४ | १ |

सर्व ल० रूप संख्या किंवा शून्य गु० रूपसं०.
एक गुर्वा० किंवा ३ ल० रूपसं०.
द्विगु० किंवा द्विल० रूपसं०.
त्रिगु० किंवा एक ल० रूपसं०.
चार किंवा सर्व गु० रूपसंख्या किंवा शून्य ल० रूपसंख्या.

उजवे बाजूकडील शेवटल्या शेवटल्या सर्व कोष्टकांत १ हा अंक लिहिला. नंतर मेरूच्या पहिल्या दोन कोष्टकांच्या पंक्तींतील १ ह्या अंकाची बेरीज २, ही दुसऱ्या कोष्टकपंक्तींतील रिकाम्या कोष्टकांत लिहिली. नंतर दुसऱ्या कोष्टकपंक्तींतील पहिल्या व दुसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज ३ ही, व दुसऱ्या व तिसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज ३, ह्या दोन बेरजा क्रमानें तिसऱ्या-कोष्टकपंक्तींतील रिकाम्या कोष्टकांत लिहिल्या. नंतर तिसऱ्या कोष्टकपंक्तींतील पहिल्या व दुसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज ४, व दुसऱ्या व तिसऱ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज ६, व तिसऱ्या व चवथ्या कोष्टकांतील अंकांची बेरीज ४, ह्या बेरजा चवथ्या कोष्टकपंक्तींतील रिकाम्या कोष्टकांत लिहिल्या. याप्रमाणें ही शेवटली (चौथी) कोष्टकपंक्ति अंकानें भरली. त्यांत शेवटले कोष्टकपंक्तींतील उजवेकडील शेवटल्या कोष्टकांत १ हा अंक आहे. म्हणून ती सर्व लघ्वात्मक रूपांची संख्या होय. डावेकडील कोष्टकांत ४, हा अंक आहे म्हणून ती एक गुर्वात्मक रूपांची संख्या, व त्याच्या पुढील कोष्टकांत ६ हा अंक आहे म्हणून ती दोन गुर्वात्मक रूपांची संख्या, त्याचे पुढील कोष्टकांत ४ हा अंक आहे म्हणून

ही तीन गुर्वात्मक रूपांची संख्या, त्याचे पुढील म्हणजे शेवटल्या कोष्टकांत १ हा अंक आहे, म्हणून ही चार गुर्वात्मक किंवा सर्व गुर्वात्मक रूपांची संख्या होय. यांत जें एक गुर्वात्मक रूप तेंच तीन लघ्वात्मक रूप होय. जें दोन गुर्वात्मक रूप तेंच दोन लघ्वात्मक होय. जें तीन गुर्वात्मक रूप तेंच एक गुर्वात्मक रूप होय. जें चार लघ्वात्मक तें शून्यलघ्वात्मक होय.

**प्रत्यय ६ वा : पताका :** प्रस्तारांत सर्व लघ्वात्मक रूपें किती, सर्व गुर्वात्मक रूपें किती, एक लघ्वात्मक रूपें किती, दोन लघ्वात्मक रूपें किती इत्यादि; एक गुर्वात्मक रूपें किती, दोन गुर्वात्मक रूपें किती, इत्यादि; यांच्या संख्या **मेरू**वरून समजतात; परंतु तीं तीं रूपें प्रस्तारांत कितव्या कितव्या स्थानीं आहेत हें समजण्याकरितां एके प्रकारची कोष्टकांची रचना करावी लागते, त्या रचनेच्या आकारावरून तिला **पताका** असें म्हणतात. ती करण्याची रीति अशी :

जितक्या वर्णांची **पताका** कर्तव्य असेल तितक्या वर्णांचे प्रस्तारांतील सर्व गुर्वात्मक रूपें किती, एक लघ्वात्मक रूपें किती, दोन लघ्वात्मक रूपें किती, याप्रमाणें सर्व लघ्वात्मक रूपांपर्यन्तच्या संख्या एकापुढें एक क्रमानें लिहाव्या. नंतर सर्व गुर्वात्मक रूपांच्या संख्येइतकी जी संख्या असेल तितक्या कोष्टकांची पंक्ति पहिल्यानें लिहावी. तिच्यावर एक लघ्वात्मक रूपांची जी संख्या असेल तिच्या इतक्या कोष्टकांची दुसरी पंक्ति लिहावी. तिच्यावर दोनलघ्वात्मक रूपांची जी संख्या असेल तिच्याइतक्या कोष्टकांची पंक्ति लिहावी. याप्रमाणें सर्व लघ्वात्मक संख्येपर्यन्त एकावर एक कोष्टकपंक्ति लिहून शेवटीं सर्व लघ्वात्मक रूपांच्या संख्येइतक्या कोष्टकांची पंक्ति शेवटीं लिहावी. जशी खालीं चार वर्णांच्या **पताके**ची आकृति काढली आहे, त्याप्रमाणें तिची आकृति होईल.

( चार वर्णांची पताका )



नंतर प्रत्येक कोष्टकपंक्तीच्या डावेकडील पहिल्या पहिल्या कोष्टकांत सूच्यंक म्हणजे १, २, ४, ८ इत्यादि असे द्विगुणित अंक खालून वर लिहावे. नंतर खालील पहिले कोष्टकांतील १ हा अंक वरील २, ४ इत्यादि सूच्यंकांस प्रत्येकीं मिळवून ज्या बेरजा येतील, त्या खालून दुसऱ्या कोष्टकपंक्तींतील २ ह्या अंकाच्या पुढील उजवेकडील कोष्टकांत क्रमानें लिहाव्या. नंतर त्या दुसऱ्या कोष्टकपंक्तींतील २ इत्यादि अंक वरील ४ इत्यादि सूच्यंकांत प्रत्येकीं मिळवून ज्या बेरजा येतील त्या तिसऱ्या कोष्टकपंक्तींत चार ह्या अंकाच्या पुढील उजवेकडच्या कोष्टकांत क्रमानें लिहाव्या. याप्रमाणें प्रत्येक कोष्टपंक्तींतील प्रत्येक अंक वरील प्रत्येक सूच्यंकांत मिळवून ज्या बेरजा येतील त्या त्यांचे वरील कोष्टकपंक्तींत लिहीत जाव्या. याप्रमाणें सर्व कोष्टकें भरत तोंपर्यंत करावें. त्यांत जी बेरीज प्रस्तारांतील एकंदर रूपांच्या संख्येबरोबर येईल, किंवा तिच्याहून अधिक येईल, ती बेरीज व जी बेरीज एकवार कोष्टकांत पूर्वीं लिहिली गेली ती बेरीज पुन्हा आली असतां ती, अशा बेरजा कोष्टकांत लिहूं नयेत. या गोष्टीविषयीं नीट लक्ष्य पुरवावें. याप्रमाणें पताकेंतील सर्व कोष्टकें अंकांनीं भरलीं म्हणजे पताकेच्या खालच्या बाजूस पहिल्या कोष्टकपंक्तींत (येथें एकच कोष्टक असतें म्हणून त्यांत) जो अंक असेल तितक्या स्थानीं सर्व गुर्वात्मक रूपें आहेत असें समजावें. नंतर त्याचे वरील कोष्टकपंक्तींत जे जे अंक असतील तितकावे तितकावे स्थानीं एकलघ्वात्मक रूपें व त्याचे वरील पंक्तींत जे अंक असतील तितकावे तितकावे स्थानीं तीनलघ्वात्मक रूपें, याप्रमाणें पुढेंहि चारलघ्वात्मक, पांचलघ्वात्मक इत्यादिकांचीं कोष्टकपंक्तींतील अंक पाहून तितकावे तितकावे स्थानीं तीं तीं रूपें आहेत असें समजून शेवटले कोष्टकपंक्तींत (येथें एकच कोष्टक असतें म्हणून त्यांत) जो अंक असेल तितकावे स्थानीं सर्वलघ्वात्मक रूप आहे असें समजावें.

उदाहरण: चार वर्णांच्या प्रस्तारांत सर्व गुर्वात्मक रूपांची संख्या १, एक लघ्वात्मक रूपांची संख्या ४, दोन लघ्वात्मक रूपांची संख्या ६, व चार किंवा सर्व लघ्वात्मक रूपांची संख्या १, अशा रूपांच्या संख्या समजल्या आहेत. तर तीं तीं रूपें त्या प्रस्तारांत कितवे कितवे स्थानीं आहेत तीं सांग असा प्रश्न आहे; तर वर रीतींत सांगितल्याप्रमाणें कोष्टकात्मक **पताका**

काढून त्या कोष्टकांत अंक भरून त्यांच्या बेरजाहि लिहून कृति केली आहे, ती समजण्याकरितां पुढें आकृति दिली आहे ती पाहावी :

## चार वर्णांची पताका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १६ | सर्व लघ्वात्मकरूपाचें स्थान. | | | | | |
| ८ | १२ | १४ | १५ | तीन लघ्वात्मकरूप स्थानें. | | |
| ४ | ६ | १० | ७ | ११ | १३ | दोन लघ्वात्मकरूप स्थानें. |
| २ | ३ | ५ | ९ | एक लघ्वात्मक किंवा त्रिगुर्वात्मरूप स्थानें. | | |
| १ | सर्व गुर्वात्मक रूपाचें स्थान. | | | | | |

## खुलासा

ह्या उदाहरणांत सर्व गुर्वात्मक रूपांची संख्या १ आहे. म्हणून प्रथम-कोष्टकपंक्ति एक कोष्टकात्मक लिहिली. पुढें एक लघ्वात्मकरूपांची संख्या चार आहे म्हणून चार कोष्टकांची पंक्ति प्रथम कोष्टकाच्या वरील बाजूस लिहिली. नंतर दोन् लघ्वात्मक रूपांची संख्या ६ आहे म्हणून तिसरी साहा कोष्टकांची पंक्ति लिहिली. तिच्यावर तीन लघ्वात्मक रूपांची संख्या ४ आहे म्हणून चार कोष्टकांची पंक्ति लिहिली. तिच्यावर शेवटीं सर्व लघ्वात्मक रूपांची संख्या १ आहे म्हणून एकच कोष्टकात्मक पंक्ति लिहिली. याप्रमाणें **पताका** सिद्ध झाल्यावर तिच्या डावेकडील प्रत्येक पहिल्या कोष्टकांतून सूच्यंक म्हणजे १, २, ४, ८ असें द्विगुणित अंक लिहिले. नंतर पहिल्या कोष्टकांतील १ हा अंक त्याचेवरील २, ४ इत्यादि सूच्यंकास प्रत्येकीं मिळवून ३, ५, ९ ह्या बेरजा आल्या. त्या दुसऱ्या कोष्टकपंक्तींत २ अंका-पुढील उजवेकडच्या कोष्टकांत क्रमानें लिहिल्या. नंतर दुसरे पंक्तींतील २, ३, ५, ९ हे अंक वरील ४, ८ इत्यादि सूच्यंकास प्रत्येकीं मिळवून ६, १०, ७, ११ व १३ ह्या बेरजा आल्या, त्या तिसऱ्या कोष्टकपंक्तींत ४ ह्या अंका-पुढील उजवेकडच्या कोष्टकांत क्रमानें लिहिल्या. नंतर तिसऱ्या कोष्टक-पंक्तींतील ४, ६ इत्यादि अंक वरील ८ इत्यादि सूच्यंकांशीं प्रत्येकीं मिळवून १२, १४ व १५ ह्या बेरजा आल्या. त्या चवथ्या कोष्टकपंक्तींत ८ ह्या अंकाच्या पुढील उजवेकडच्या कोष्टकांत क्रमानें लिहिल्या. याप्रमाणें करितां **पताकें**तील सर्व म्हणजे सोळाहि कोष्टकें अंकांनीं भरलीं. आतां **पताकेच्या**

# पांच वर्णांच्या प्रस्तारादि सहा प्रत्ययांचीं उदाहरणें

## प्रत्यय १ प्रस्तार

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | १७ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | । |
| २ | । | ऽ | ऽ | ऽ | ऽ | १८ | । | ऽ | ऽ | ऽ | । |
| ३ | ऽ | । | ऽ | ऽ | ऽ | १९ | ऽ | । | ऽ | ऽ | । |
| ४ | । | । | ऽ | ऽ | ऽ | २० | । | । | ऽ | ऽ | । |
| ५ | ऽ | ऽ | । | ऽ | ऽ | २१ | ऽ | ऽ | । | ऽ | । |
| ६ | । | ऽ | । | ऽ | ऽ | २२ | । | ऽ | । | ऽ | । |
| ७ | ऽ | । | । | ऽ | ऽ | २३ | ऽ | । | । | ऽ | । |
| ८ | । | । | । | ऽ | ऽ | २४ | । | । | । | ऽ | । |
| ९ | ऽ | ऽ | ऽ | । | ऽ | २५ | ऽ | ऽ | ऽ | । | । |
| १० | । | ऽ | ऽ | । | ऽ | २६ | । | ऽ | ऽ | । | । |
| ११ | ऽ | । | ऽ | । | ऽ | २७ | ऽ | । | ऽ | । | । |
| १२ | । | । | ऽ | । | ऽ | २८ | । | । | ऽ | । | । |
| १३ | ऽ | ऽ | । | । | ऽ | २९ | ऽ | ऽ | । | । | । |
| १४ | । | ऽ | । | । | ऽ | ३० | । | ऽ | । | । | । |
| १५ | ऽ | । | । | । | ऽ | ३१ | ऽ | । | । | । | । |
| १६ | । | । | । | । | ऽ | ३२ | । | । | । | । | । |

वरील कोष्टक म्हणजे चार वर्णांची पताका होय.

वरील पहिले कोष्टकांत १ हा अंक आहे म्हणून सर्व गुर्वात्मकरूप प्रस्तारांतील पहिले स्थानीं आहे असें समजावें. तसेंच पताकेच्या दुसऱ्या कोष्टकपंक्तींत २, ३, ५, ९ हे अंक आहेत म्हणून एकलघ्वात्मकरूप प्रस्तारांत दुसरें, तिसरें, पांचवें व नववें स्थानीं आहे असें समजावें. तसेंच तिसऱ्या पंक्तींत ४, ६, १०, ७, ११, १३ हे अंक आहेत म्हणून दोन लघ्वात्मक रूपें प्रस्तारांत चवथ्या, साहाव्या, दाहाव्या, सातव्या, आकराव्या व तेराव्या, ह्या स्थानीं आहेत असें समजावें. तसेंच चवथ्या पंक्तींत ८, १२, १४, १५ हे अंक आहेत म्हणून तीन लघ्वात्मक रूपें प्रस्तारांत आठव्या, बाराव्या, चवदाव्या व पंधराव्या स्थानीं आहेत असें समजावें. व शेवटील कोष्टकांत १६ हा अंक आहे म्हणून सर्व लघ्वात्मकरूप प्रस्तारांतील सोळाव्या स्थानीं आहे असें समजावें हें उत्तर.

वरील अंकांच्या बेरजा करितांना ज्यांची बेरीज १६ ( प्रस्तार संख्ये-इतकी ) आहे किंवा तिजहून जास्त येते त्या बेरजा कोष्टकांत न लिहितां सोडून दिल्या. तसेंच एकवार जी बेरीज कोष्टकांत लिहिली गेली तितकीच बेरीज दुसऱ्या अंकांची आली असतां तीहि रीतींत सांगितल्याप्रमाणें कोष्टकांत लिहिली नाहीं.

ह्या बेरजांच्या धरसोडीविषयीं वाचकांनीं उदाहरण करतांना फार लक्ष्य पुरवून सावधगिरी ठेविली पाहिजे. नाहीं तर लक्ष्य चुकून घोंटाळा होईल.

## प्रत्यय दुसरा सूची

एकादि द्विगुण अंक १, २, ४, ८, १६.

वर्णपंक्ति ऽ ऽ ऽ ऽ ऽ

( १, २, ४, ८, १६ ) ही सूची होय. हें उत्तर.

ह्या सूचीवरून संख्या उत्पन्न झाल्या त्या :

सूची अंत्यांक : १६ × २ = ३२ ही सर्व रूपभेद संख्या.

सूची अंत्यांक : १६ = लादि गादि लान्त गान्त रूपभेद संख्या.

सूची उपांत्य : ८ = लादि लान्त व गादि गान्त रूपभेद संख्या.

दुसरी रीति : $२^{५}$= ३२ सर्व रूपभेद संख्या हें उत्तर.

## प्रत्यय ३ रा नष्ट

११ वें रूप नष्ट, झालें आहे तें कसें असावें ?

कृति

| नष्टसंख्या | सैकनिमे | निमे | सैकनिमे. | निमे |
|---|---|---|---|---|
| ११ | ६ | ३ | २ | १ |
| विषम | सम | विषम | सम | विषम |
| ऽ | । | ऽ | । | ऽ |

( ऽ, ।, ऽ, ।, ऽ, ) हें नष्ट झालेलें रूप हें उत्तर.

## प्रत्यय ४ था उद्दिष्ट

( ।, ऽ, ।, ऽ, ।. ) हें रूप कितवें ?

कृति

सूची अंक १, २, ४, ८, १६

दिलेलें रूप ।, ऽ, ।, ऽ, ।

लघूवरील अंकांची बेरीज सैक
१+४+१६=२१+१=२२
दिलेलें रूप ३२ वें हें उत्तर.

## प्रत्यय ५ वा मेरू

पांचग किंवा शून्यल, चारग किंवा एकल, तीनग किंवा दोनल, दोनग किंवा तीनल, एकग किंवा चारल, शून्यग किंवा पांचल, असे वर्ण ज्यांत, अशा वेगळाल्या रूपांच्या प्रत्येकीं संख्या सांग. असा प्रश्न.

कृति

मेरू

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | | | | |
| १ | २ | १ | | | |
| १ | ३ | ३ | १ | | |
| १ | ४ | ६ | ४ | १ | |
| १ | ५ | १० | १० | ५ | १ |
| शू.ल ५ग | १ल ४ग | २ल ३ग | ३ल २ग | ४ल १ग | ५लकिं. ०ग |

उत्तर

५ग किंवा शून्य ल अशा रूपाची सं० १
४ग किंवा १ ल अशा रूपाची सं० ५
३ग किंवा २ ल अशा रूपाची सं० १०
२ग किंवा ३ ल अशा रूपाची सं० १०
१ग किंवा ४ ल अशा रूपाची सं० ५
शून्य ग किंवा ५ ल अशा रूपाची सं० १

## प्रत्यय ६ वा पताका

पांचग किंवा शून्यल अशा रूपभेदाची संख्या १ याप्रमाणें या प्रस्तारांतील पांचहि प्रकारचे रूपभेदांच्या संख्या, वर मेरूवरून समजल्या, त्यांतील प्रत्येक रूपाचें स्थान कितवें? असा प्रश्न आहे तर.

कृति व उत्तर

(पताका)

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ गचें स्थान: | ३२ | | | | | | | | | | ५ ग किंवा शून्य ल यांचें स्थान ३२ वें. |
| ४ गचीं स्थानें: | १६ | २४ | २८ | ३० | ३१ | | | | | | ४ ग किंवा १ ल यांचीं स्थानें. |
| ३ गचीं स्थानें: | ८ | १२ | २० | १४ | २२ | २६ | १५ | २३ | २७ | २९ | ३ ग किंवा २लचीं स्थानें. |
| २ गचीं स्थानें: | ४ | ६ | १० | १८ | ७ | ११ | १९ | १३ | २१ | २५ | २ ग किंवा ३लचीं स्थानें. |
| १ गचीं स्थानें: | २ | ३ | ५ | ९ | १७ | | | | | | १ ग किंवा ४ लचीं स्थानें. |
| शून्य गचें किंवा ५ लचें स्थान: | १ | | | | | | | | | | शून्य ग किंवा ५ ल यांचें स्थान पहिलें. |

ह्याप्रमाणें विद्यार्थ्यांनीं आणखी उदाहरणें कल्पून अभ्यास करावा.

— ग्रंथसमाप्त —

# ग्रंथकर्त्याचें मनोगत

महाराष्ट्र भाषा जीस प्राकृत भाषा असेंहि म्हणतात, त्या भाषेंतील कविताग्रंथ अलीकडे छापून त्यांचा बहुत प्रसार झाला आहे; व शाळांतहि ते शिकविण्याचा प्रघात सरकारनें घातला आहे; तसेंच प्राकृतांत नाटकादिकांचें भाषांतर करणें व नवीन ग्रंथ रचणें, यांस उत्तेजन मिळाल्यापासून तसले ग्रंथहि बहुत प्रसिद्ध झाले आहेत व आणखीहि होत आहेत; अशा कारणांमुळें पहिल्यापेक्षां हल्लीं प्राकृत काव्यें वाचण्याची लोकांत विशेष अभिरुची उत्पन्न होऊन त्यांचा अभ्यास करण्याची प्रवृत्ति पडत चालली आहे. ही गोष्ट स्पष्टपणें सर्वांच्या अनुभवास येतच आहे.

आतां ज्यापेक्षां प्राकृत काव्यें वाचण्याची व त्यांचा अभ्यास करण्याची विशेष प्रवृत्ति पडत चालली आहे. त्यापेक्षां त्यांचीं लक्षणें, त्यांचे भेद, त्यांचे गुण, त्यांचे दोष, त्यांतील रस इत्यादिक गोष्टींचें ज्ञान संपादन करणें हें अवश्यक होय हें उघड आहे. अलंकार, छंद, यांवर वेगळाले केलेले लहान लहान ग्रंथ आढळण्यांत येतात; परंतु काव्याच्या सकल अंगांचीं लक्षणें व उदाहरणें ज्यांत सविस्तर निरूपिलीं आहेत असा प्राकृतांत एकहि ग्रंथ झालेला अद्यापि आढळण्यांत येत नाहीं, याकरितां हा नवीन ग्रंथ रचून यास **साहित्यशास्त्र** असें नांव ठेविलें आहे. या ग्रंथांत काव्याचें लक्षण, प्रयोजन, गुण, दोष, रस, अलंकार इत्यादि साहित्यशास्त्रसंबंधीं ज्या गोष्टी त्या सर्वांचें संक्षिप्त रीतीनें निरूपण केलें आहे.

ही महाराष्ट्र भाषा मुळीं संस्कृत भाषेपासून उत्पन्न झाली आहे, म्हणून संस्कृत साहित्यशास्त्राचे जे नियम तेच प्राय: ह्या भाषेंतील साहित्यशास्त्रसंबंधीं गोष्टीस लागू पडतात, यास्तव हा प्राकृत ग्रंथ संस्कृत साहित्यग्रंथाच्याच आधारानें रचिला आहे.

ह्या ग्रंथाचीं आठ प्रकरणें केलीं आहेत. त्यांत प्रथम प्रकरणांत काव्याचें **लक्षण व प्रयोजन** इत्यादिक सांगितलें आहे; दुसऱ्या प्रकरणांत अभिधा, लक्षणा, व्यंजना ह्या वृत्तींचें निरूपण केलें आहे; तिसऱ्या प्रकरणांत **नायक** व **नायिका** हीं सांगितलीं आहेत; चौथ्या प्रकरणांत **रस** व **भाव** इत्यादिकांचें प्रतिपादन





केलें आहे; पांचव्या प्रकरणांत **गुणांचें** विवेचन केलें आहे; सहाव्या प्रकरणांत **शब्दालंकार** व **अर्थालंकार** यांचें विवरण केलें आहे; सातव्या प्रकरणांत **छंदांचें** व **वृत्तांचें** कथन करून शेवटीं आठव्या प्रकरणांत काव्यसंबंधीं **दोष** व दोषांपैकीं कोणता कोणत्या प्रसंगीं ग्राह्य होतो ह्या गोष्टींचें उपपादन केलें आहे.

आतां या ग्रंथांत संस्कृतास लागू पडणाऱ्या गोष्टी बऱ्याच आल्या आहेत हें ठीक नाहीं असें वाटेल; परंतु **वामन, मोरोपंत** आदिकरून कित्येक प्राकृत कवींच्या काव्यांतहि शुद्ध संस्कृत शब्दांचा बराच भरणा आढळतो; म्हणून तदुपयोगी गोष्टी सांगणें अवश्य पडलें. ह्या ग्रंथांत जीं उदाहरणें लिहिलीं आहेत तीं कोठेंकोठें प्राकृत काव्यांतून निवडून घेऊन व कोठेंकोठें नवीं करून लिहिलीं आहेत, ज्या गोष्टी कोष्टकांत सांगणें सोईस्कर दिसलें त्या गोष्टींचा पाल्हाळ न लिहितां कोष्टकेंच दिलीं आहेत. त्या योगानें बहुत अर्थाचा थोडक्यांत संग्रह होऊन विद्यार्थ्यांस ध्यानांत धरण्यास सुलभ पडावें असा हेतु आहे. मूळांतील कठिण शब्द समजण्याकरितां व क्वचित् सत्संबंधीं विशेष गोष्टी समजण्याकरितां पृष्ठाच्या खालीं टीपा घातल्या आहेत.

प्राकृत साहित्यशास्त्राचें ज्ञान होण्याकरितां हा ग्रंथ मुख्यत्वें केला आहे; तथापि जे कोणी संस्कृत भाषा शिकत असतील, त्यांसहि संस्कृत साहित्यशास्त्राचें ज्ञान होण्यास हा पुष्कळ उपयोगी पडेल असें संभवतें; कारण **रसालंकारादि** मुख्यमुख्य गोष्टी उभय भाषांच्याहि प्रायः समानच आहेत, हें त्या भाषांचें जें मर्म जाणणारे त्यांस विदितच आहे.

असो. ह्याप्रमाणें हा ग्रंथ मीं यथामति रचिला आहे. आणि तो चांगला होण्याविषयीं होईल तितका प्रयत्नहि केला आहे; तथापि त्यांत दोष बहुत असतीलच. ह्यांत संशय नाहीं. त्या दोषांकडे दृष्टि न देतां गुणलेश असतील त्यांचा सहृदय व रसिकजनांनीं अंगीकार करावा, अशी त्यांस माझी विनयपूर्वक प्रार्थना आहे.

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

पहिल्या आवृत्तींत कांहीं चुका व दोष आढळले ते ह्या आवृत्तींत दुरुस्त केले आहेत. विद्यार्थ्यांस चांगला बोध होण्याकरितां स्थलविशेषीं न्यूनाधिकभावहि केला आहे. हा ग्रंथ मुख्यत्वेंकरून अलंकारशास्त्रासंबंधींच असतां ह्यांत क्वचित् स्थलीं कांहीं गोष्टी अप्रासंगिक सांगण्यांत आल्या आहेत;

त्या विद्यार्थ्यांस इतर गोष्टींचेंहि सहज रीतीनें ज्ञान व्हावें अशा बुद्धीनें सांगितल्या आहेत, असें समजून सूज्ञ वाचकांनीं त्याबद्दल क्षमा करावी.

ह्या आवृत्तीस एक नवी पुरवणी जोडली आहे. तिचे दोन भाग आहेत. त्यांपैकीं पहिल्या भागांत **वैतालीय, औपच्छंदसिक, पुष्पिताग्रा,** लोकांमध्यें ज्यांना अनुष्टुभ् श्लोक असें म्हणतात, तो अनुष्टुभ् छंद, व मात्रासमक म्हणून एक तालसुरावर म्हणण्याजोगा मनोवेधक छंद आहे तो, ह्या विषयींचें निरूपण केलें आहे. दुसऱ्या भागांत प्रस्तारप्रकरणाविषयीं थोडीशी माहिती दिली आहे. हें प्रस्तारप्रकरण संस्कृत ग्रंथकारांनीं विस्तारेंकरून सांगितलें आहे. **वेदाचे** सहा अंगांपैकीं **छंद** म्हणून जें एक अंग, तें **पिंगल**नागानें केलें. त्यांत **वैदिक** व **लौकिक** छंद सांगितल्यानंतर शेवटीं गुरु व लघु ह्या अक्षरांच्या फेरबदलीनें प्रत्येक छंदाच्या पोटीं किती किती वृत्तें उत्पन्न होतात, हें समजण्याकरितां छंदाच्या अंगत्वेंकरूनच या प्रस्तारप्रकरणाचें सूत्ररूपानें दिक्प्रदर्शन केलें. त्यावरूनच पुढील ग्रंथकारांनीं षड्ज ऋषभ इत्यादि गायनांतील सप्तस्वर, एकादि नव अंक, विष्णु इत्यादि देवांच्या हातांतील शंखचक्रादि आयुधें, इत्यादिकांच्या स्थानभेदानें किती किती भिन्न प्रकार होतात, हें काढण्याच्या रीती विस्तारानें सांगितल्या. हा प्रकार इंग्रजीमध्यें आहे. त्यास " कांबिनेशन आणि परमिटेशन " असें म्हणतात. त्यावरून प्रस्ताराचीं संख्या मात्र काढतां येते; परंतु **नष्ट उद्दिष्ट** इत्यादि जे संस्कृत ग्रंथकारांनीं प्रकार सांगितले आहेत, त्यांत प्रस्तारांतील एखादें रूप नाहींसें झालें असतां तें कसें काढावें व रूप लिहून दिलें असतां तें त्या पंक्तींत कितवें असावें इत्यादि समजण्याच्या अपूर्व युक्ति संस्कृत ग्रंथकारांनीं सांगितल्या आहेत. त्या पाहून फारच चमत्कार[1] वाटतो. हा चमत्कार इंग्रजी ग्रंथांत आढळत

---

१. एके प्रसंगीं गरुडाची व पिंगल नामक नागाची गांठ पडली. तेव्हां नागानें आपला बचाव करण्याकरितां नानाविध छंद व त्यांचे वर्णमात्रादि प्रस्तार यांचे अद्भुत प्रकार दाखवून गरुडास मोहित करून टाकलें. व प्रस्ताराचे निमित्तानें तो हळूहळू समुद्रतीरापर्यंतहि जाऊन पोहोंचला. तेव्हां आपल्या कृतीनें गरुड मुग्ध झाला आहे असें पाहून तो तेथून झटकन् द्वीपान्तरास ( पाताळास ) निघून गेला. ह्याप्रमाणें पिंगलानें छंदःप्रस्तार रचनेनें

नाहीं. याचा कांहीं मासला लोकांस कळावा म्हणून आम्हीं या ग्रंथांत थोडासा दिला आहे. या प्रकरणीं आम्हीं **प्रस्तारविद्या** म्हणून अलीकडे एक स्वतंत्र ग्रंथ केला आहे. त्यामध्यें वर्णप्रस्तार, मात्राप्रस्तार, स्वरप्रस्तार इत्यादि सर्व प्रकरणें सविस्तर निरूपित केलीं आहेत. लोकांस त्याची अभिरुचि नाहीं म्हणून तो अजून छापून प्रसिद्ध केला नाहीं. आश्रय मिळाल्यास तो छापून प्रसिद्ध करावा. असें मनांत आहे. असो. याप्रमाणें ही नवीन आवृत्ति छापली आहे. हिच्यांतहि कांहीं चुका व दोष असतील, त्यांजविषयीं क्षमा करून जे गुणलेश असतील त्यांचाच अंगीकार करावा, अशी विद्वज्जनांस प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितों.

---

गरुडास मोहित करून जिंकिलें ह्या अख्यायिकेस अनुसरून **प्रस्तारचिंतामणि**-कारानें प्रस्तारसंबंधीं **पताका** नामक एके प्रकारची अन्वर्थता दाखविण्या-करितां "विजित्य नानारचनानुपूर्व्या। विहंगमेशं सरिदीशतीरे ॥ कीर्तेः पताकारचिताहिनाया। मात्रा पताका रचिता मयासा ॥ १ ॥" असें म्हटलें आहे. एवढ्याचें तात्पर्य हेंच कीं हें प्रस्तारप्रकरण तारीफ करण्याजोगें अत्यंत चमत्कारिक असें प्राचीन पंडितांनीं अपूर्व बुद्धिकौशल्यानें केलें आहे, तें समजून घेऊन त्यांच्या त्या बुद्धिमत्तेचा अनुभव घ्यावा अशी आमची आग्रहपूर्वक सूज्ञ वाचकांस सूचना आहे.

मु० नासीक,<br>ता० १५ मार्च,<br>सन १८९४ इसवी.

**गणेश सदाशिवशास्त्री लेले,**<br>**त्र्यंबककर.**

